# नवभारत

वर्ष ८ वें ] मार्च १९५५ [ अंक ६ वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## ‘ नवभारत ’ निधि

# विनंति

‘ नवभारत ’ मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ‘ नवभारता’च्या मागील दोन अंकांत प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. बा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. बा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

‘ नवभारत ’ निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी वरील विनंतिपत्रकांत केलेली प्रार्थना आम्ही सर्वांना करीत आहोंत. १०० रु देणगी देणारास ‘ नवभारत ’ मासिक दहा वर्षें मिळत जाईल.

‘ नवभारत ’ निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

‘ नवभारता’च्या गेल्या म्हणजे फेब्रुवारी १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | |
|---|---|
| श्री. के. द. मोहनी ( नागपूर ) | रु. १०० |
| सौ. मंदा आपटे ( मुंबई ) | १०० |
| श्री. ग. म. गोळे ( सासवड ) | १०० |
| श्री. चंदनमल चुनीलाल वेदमुथा ( सासवड ) | १०० |
| श्री. सरदार बाळासाहेब पुरंदरे ( सासवड ) | १०० |
| श्री. अनंत गोविंद महागांवकर ( सासवड ) | १०० |
| श्री. वसंत गणेश निरगुडे ( मोहोळ ) | १०० |
| प्रा. ए. रा. धोंगडे ( मुंबई ) | १०० |
| डॉ. इन्दुमती देव ( यावल ) | १०० |
| श्री. रामचंद्र शंकर शेटे ( बीड ) | |
| ,, आर्. एस्. भारतीय ( बीड ) | |
| ,, श्री. गोविन्द दत्तात्रेय कर्वे ( मुंबई ) | |
| | ९१२ |
| मागील महिन्यांत जमा झालेली रक्कम | ६२७ |
| एकूण | १५३९ |

‘ नवभारत ’ निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. वेडेकर (खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

‘ नवभारत ’ निधि-समितीचें कार्यालय c/o ‘ नवभारत ’ मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या “ खजिनदार, ‘ नवभारत ’ निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ ” या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

२५।२।१९५५ **लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)
**कृ. ना. फडके**, **मा. प. मंगुडकर** — कार्यवाह










सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें | अंक सहावा

# नवभारत

मार्च १९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( ज. सातारा )

# 'नवभारत' मासिक, मार्च १९५५

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षीं यापूर्वीं त्यांचे लेख आले त्यावेळीं दिला आहे– का. सं.]

प्रा. मधुसूदन फडके – कोल्हापूर येथील ' गो. कृ. गोखले कॉलेज ' मध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

प्रा. अ. ना. देशपांडे – नागपूर येथील हिस्लॉप कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास ' खंड १ ला या पुस्तकाचे लेखक.

श्री. सूर्यकान्त खाण्डेकर – एम्. ए. कोल्हापूर येथील महाराणी गर्ल्स हायस्कूलमध्यें शिक्षक.

डॉ. कृ. भि. कुलकर्णी – एम्. ए. पीएच्‌डी. मुंबई – येथील ' किशिनचंद चेलाराम ' महाविद्यालयांत मराठीचे प्राध्यापक.

श्री. गणेश कुडे – एम्. ए. अमळनेर येथील गं. स. हायस्कूलमध्यें शिक्षक.

प्रा. मा. प. मंगुडकर – पुणें येथील नौ. वाडिआ कॉलेजमध्यें राज्यशास्त्राचे प्राध्यापक. ' महात्मा फुले व सत्यशोधक चळवळीचा इतिहास ' या पुस्तकाचे लेखक.

प्रा. स. वा. कोगेकर – पुणें – विद्यापीठांत व फर्ग्युसन कॉलेजमध्यें राज्यशास्त्राचे प्राध्यापक.

प्रा. प्र. रा. दामले – पुणें – विद्यापीठांत व नौ. वाडिआ कॉलेजांत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. 'Philosophical Essays ' या पुस्तकाचे लेखक.

श्री. चिं. त्र्यं. केंघे – बी. ए. (ऑ.) ( नाशिक ). संतवाङ्मय व शांकर वेदान्त यांचे व्यासंगी.

श्री. वा. ज. कुंटे – बी. ई. ( सि. ) सांगली येथील सर्वोदयी कार्यकर्ते. ' थोरांचें श्रमजीवन ', ' अपरोक्षानुभूति ', ' भोळ्या रामजीचें रामराज्य ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. अरविन्द पुराणिक – बी. ए. ( ऑ. ) पुणें – विद्यापीठांत एम्. ए. चे विद्यार्थी.

डॉ. म. वि. आपटे – एम्. बी. बी. एस्. लोणावळें येथील ' कैवल्यधाम ' संस्थेंतील संशोधक. ' रसायनभूमिका ', ' पडत्या फळाचा संदेश ' इत्यादि पुस्तकांचे, ' महाराष्ट्र परिचय ' या ग्रंथांतील ' महाराष्ट्रवनश्री ', ' महाराष्ट्रांतील पशुपक्षी ' या लेखांचे लेखक.

श्री. ना. य. डोळे – एम्. ए. पुणें विद्यापीठांत पीएच्. डी. चे विद्यार्थी.

श्री. शा. म. जोशी – एम्. कॉम्. ( पुणें ) येथील ' साठे बिस्किट ॲन्ड चाकोलेट कंपनी ' मध्यें अकाउंटंट.

डॉ. ना. र. इनामदार – एम्. ए. पीएच्. डी. – डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या मुंबई येथील बॅंबे कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

प्रा. मधुसूदन फडके

# बर्गसन्‌ची हास्यविनोदमीमांसा

हास्यविषयाचें नेमकें मर्म कशांत असतें आणि कोणत्या आदिकारणामुळें हास्य उत्पन्न होतें या प्रश्नाचा विचार ॲरिस्टॉटल्‌पासून अनेक तत्त्ववेत्त्यांनीं केला आहे. बुद्धिग्राह्य विरोध, विसंगति, विस्मयजनकता, विपरीतपणा या व अशा निरनिराळ्या वैशिष्ट्यांचें वर्णन हास्याचें मूलकारण म्हणून अनेक तत्त्वज्ञांनीं केलें आहे. एखादी अपेक्षा एकाएकी खोटी ठरली तर हास्य उत्पन्न होतें असा कान्टचा सिद्धान्त आहे; एखादी क्रिया अचानक निष्फळ ठरल्यामुळें हंसूं लोटतें असें स्पेन्सरचें मत आहे; तर 'उदात्ताचें अनुदात्तीकरण' हेंच हास्याचें प्रधान कारण होय असा पक्ष अलेक्झांडर बेन यानें मांडला आहे. बर्गसन्‌च्या मतें वरीलसारख्या उपपत्ती कांहीं उदाहरणांना लागूं पडत असल्या तरी सर्वंकष व मूलगामी नाहींत. कान्टचा पक्ष खरा मानावा तर कांहीं प्रसंगीं अपेक्षाभंगांतून हास्याऐवजीं दुःख कां उत्पन्न होतें हें समजत नाहीं. स्पेन्सर खरा म्हणावा तर कांहीं वेळां एखाद्या क्रियेला अचानक मोठें बहारीचें फळ आल्यामुळेंहि आपण कां हंसतो याचा उलगडा होत नाहीं. बेनचा दावाहि सर्व हास्यविषयांना लागूं पडत नाहीं आणि विसंगतीसारखीं वर उल्लेखिलेलीं वैशिष्ट्येंहि ठोकळमानानें खरीं असलीं, तरी हास्यकारणांची सूक्ष्म मोमांसा तेवढ्यानें होत नाहीं. बर्गसन्‌च्या मतानें खरी गोष्ट अशी आहे कीं, जीवनाला जडतेचा विरोध झाला म्हणजेच विसंगति, अप्रमाण परिणाम आणि अपेक्षाभंग यांचा उद्भव होतो. स्वच्छ पाण्याच्या प्रवाहावर देखील मधूनमधून शेवाळ वाढतें; त्याप्रमाणें जीवनावरहि मध्येंच कुठेंतरी जडतेचें आवरण पडतें; चैतन्यावरहि गंज चढतो आणि जिवंत व्यक्तीच्या चलाख बुद्धीवरहि जडमूढतेचें तात्पुरतें अभ्र येतें. सारांश, कांहीं वेळां जिवंत व्यक्ति देखील यंत्रासारखी वर्तू लागते. सारा हास्यास्पद विपरीतपणा जीवनाच्या अशा यंत्रीकरणांतून उत्पन्न होतो.

## जीवनाचें यंत्रीकरण

जीवनाचें यंत्रीकरण झालेलें दिसलें कीं हास्य उत्पन्न होतें असा बर्गसन्‌चा एतद्विषयक मुख्य सिद्धान्त आहे. गतिमत्ता, बदल, प्रवाहीपणा, स्वेच्छा, सावधपणा आणि सलोखा या व अशा प्रकारच्या जीवनलक्षणांच्या जागीं स्थिरता, ठरीवपणा, बधिरता, परवशता, अनवधान आणि तुटकपणा यांचा प्रत्यय आला कीं हास्य उत्पन्न होतें. भौतिक सृष्टींतील पदार्थ व प्रक्रिया यांचें बंधारे फोडून जीवनशक्ति सतत वेगानें आपली वाट काढीत असते. परंतु भौतिकतेच्या विरोधापुढें कित्येक ठिकाणीं ती जेव्हां गम खाते, जीवनतत्त्वावर जडतेची कुरघोडी होते, चैतन्य मृत्तिकेच्या आहारीं जातें, आत्मशक्ति जडमूढ बनते, जीवनाचा ओघ तात्पुरता सांखळून बसतो आणि जिवंत व्यक्तीच्या हालचाली यंत्रासारख्या होऊं लागतात, तेव्हां जीवनाच्या व जडतेच्या त्या भेसळींतून हास्यास्पद विकृती उत्पन्न होतात.

हास्याला कारणीभूत असणारें जीवनाचें यंत्रीकरण प्रत्यक्ष सृष्टींत घडलेलें दिसेल अथवा एखाद्यानें आपल्या कल्पनेंतहि तें केलेलें असेल. तें कसेंहि असो, बर्गसन्‌च्या मतें त्याचे तीन ठळक प्रकार कल्पितां येतात. यंत्र ही एक निर्जीव वस्तु. ती परवश असते. तिची हालचाल जड नियमांनीं बांधलेली असते. जिवंत व्यक्तीचा व प्रत्यक्ष जीवनाचा प्रकारहि जर असाच झाला अथवा कल्पिला तर त्या त्या प्रकारें हास्य उत्पन्न होईल. सारांश, जिवंत व्यक्तीवर निर्जीव वस्तूचा आरोप होणें, आत्मस्वातंत्र्याला शारीर सहजक्रियांचा अडथळा होणें आणि जीवनाच्या अनिरुद्ध प्रवाहाला जडतेचा बांध पडणें, अशा तीन प्रकारांनीं जीवनाचें यंत्रीकरण घडतें, आणि तें तें हास्याला कारण होतें असा

---

बर्गसनचें चरित्र व तत्त्वज्ञान यासंबंधीं प्रस्तुत लेखकाचा लेख ऑगस्ट १९५४ च्या 'नवभारता'च्या अंकांत आला आहे तो जिज्ञासु वाचकांनीं अवश्य पहावा — का. सं.








बर्गसन्‌चा उपसिद्धान्त आहे.

१. उदाहरणार्थ, मंडळी, मुलें व सामान बरोबर घेऊन गाडी अगदीं सुटायच्या वेळीं स्टेशनवर आलेले चिंतोपंत डब्यांत चढले आणि सर्व सामान बरोबर आलें कीं नाहीं हें पहाण्यासाठीं डाग मोजूं लागले. " ट्रंक एक, होल्डॉल दोन, गांठोडें तीन, डबा चार, छत्री पांच, लोटी सहा, मी सात, ही आठ, बबी नऊ आणि गंप्या दहा ! बरोबर डाग दहा " – चिंतोपंतांचें हें स्वगत ऐकून आपणांस हंसूं येतें. कारण छत्री व लोटी यांच्या समवेत त्यांनीं स्वतःलाहि सहकुटुंब सहपरिवार निर्जीव वस्तूंच्या यादींत लोटलें आहे.[1]

२. मनुष्य स्वेच्छापूर्वक करीत असलेल्या वर्तनावर एखादे वेळीं देहधर्मांनीं मात केली म्हणजेहि अशीच गोष्ट घडून येते. उदाहरणार्थ, एखाद्या गोष्टीचें महत्त्व आपल्या प्रभावी वाणीनें पटवून देत असलेला वक्ता जर कां ऐन मोक्याच्या जागीं शिंकला, तर आपल्याला हसूं आंवरावयाचें नाहीं. गंभीर नाटकांतहि नायकाचा उदात्तपणा कायम रहावा म्हणून तो सहसा खातांपितांना अथवा सर्वसामान्य माणसासारखा बसलेलाहि दाखवीत नाहींत याचेंहि इंगित याच कारणांत आहे. गांभीर्य आणि हास्यास्पदता यांमधील हा नेमका फरक नेपोलियननेंहि ओळखलेला असावा. म्हणूनच तो म्हणत असें कीं, ' एखादें बोलणें निकरावर आलें आणि तापलेली हवा थोडी सर्द करावी असें आपल्याला वाटलें तर मंडळींना क्षणभर खालीं बसण्याची आपण विनंति करावी ! '

३. जीवनाच्या खुल्या व्यापारावर जडतेचें बंधन पडलें, निसर्ग, समाज आणि व्यक्ति यांच्या जीवनाच्या झुळझुळीत सणंगावर जडतेचें ठिगळ चढलेलें दिसलें म्हणजेहि आपल्याला हसूं येतें. पुष्कळदां निवडणुकांच्या धामधुमींत उमेदवारांच्या खुणांचीं चित्रें व घोषणांचे फलक यांनीं एखाद्या खुंटाळ्याप्रमाणें एकादें झाड लगडलेलें असतें. तें दृश्य याच कारणामुळें आपणास हास्यास्पद वाटतें. प्रचारांतून गेलेला पेहेराव परिधान करणाऱ्या माणसाला आपण याच कारणासाठीं हंसतों. जीवनाचा पुढें पुढें वाहणारा ओघ त्यामुळें अडल्यासारखा किंवा मागें खेंचल्यासारखा दिसतो. किंबहुना एखाद्यानें कोणतेंहि कृत्रिम सोंग आणलें कीं याच कारणामुळें तें हास्यास्पद होतें. सोंग घेणें अथवा मुखवटा धारण करणें याचा अर्थच जीवनाच्या मुक्त संचाराला ठराविक चौकटीचा आळा घालणें होय. ठराविक नियमांच्या गवसणींत जीवन जखडलें गेलें तर आपल्याला हंसूं हें येणारच. एखाद्या सभेंत संदेश-वाचनाचा किंवा हारसमर्पणाचा ठराविक ठशाचा उपचार सुरू झाला कीं आपणास याच कारणामुळें हंसावयास येतें. जीवनामध्यें शास्त्रोक्तपणाचें स्तोम माजलें म्हणजेहि असाच परिणाम होतो. एका मोठ्या खुनाच्या प्रकरणीं पार्लमेंटांत प्रश्नोत्तरें चालू असतां एका सन्मान्य सभासदानें गृहमंत्र्यांना सवाल केला कीं, ' खून झाला हें खरें असलें तरी खुनी इसम स्टेशनवर उलट बाजूला उतरला, त्यामुळें रेलवे-कंपनीच्या नियमाचा भंग झाला हें सरकारच्या लक्षांत आलें आहे काय ? ' सन्मान्य सभासदाच्या या महत्त्वाच्या शंकेमुळें सभागृहांत हंशा पिकला नसेल तरच नवल ! मोलिएरच्या नाटकांतील बाहिस नांवाचा एक डॉक्टर आपल्या शास्त्राची महती गातांना असें एक उत्साहाचें विधान करितो कीं ' वैद्यकशास्त्राचे सुंदर नियम झुगारून देऊन जगण्यापेक्षां ते पाळतां पाळतां खरोखर मेलेलेंहि वाईट नाहीं ? ' पण यामुळें जीवनशास्त्रांतील नियमांचें महत्त्व आपण प्रत्यक्ष जीवनापेक्षांहि वाढवीत आहों हें त्याच्या लक्षांत येत नाहीं !

## वस्तु व आचरण यांवर आधारलेला विनय

वस्तुरूप, आचरण, प्रसंग, शब्द आणि स्वभाव अशा पांच प्रमुख अधिष्ठानांवर आधारलेल्या हास्यविषयांची चिकित्सा करून त्यांना आपला मुख्य सिद्धान्त कसा लागू पडतो हें बर्गसन्‌नें सविस्तर दर्शविलें आहे.

पुष्कळदां एखाद्या वस्तूच्या अथवा व्यक्तीच्या विशिष्ट स्वरूपामुळें विनोद उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, कांहीं माणसांची सूरत सदा रडवेली दिसते, तर एखादी काल्पनिक तुतारी फुंकीत असल्यासारखा कांहीं माणसांनी तोंडाचा सदैव चंबू केलेला असतो. वस्तुतः मनुष्याची मुद्रा हालती, खेळती, लवचिक असावयास पाहिजे. पण तीच एकारलेली व सदैव गोठल्यासारखी दिसूं लागली कीं हास्यास्पद होते. व्यंगचित्रांत देखील

[1] आपल्या हास्यविनोदमीमांसेंत बर्गसन्‌नें योजिलेलीं उदाहरणेंच, क्वचित् थोडा फरक करून, प्रस्तुत लेखांत वापरलीं आहेत.

व्यक्तीच्या ठिकाणीं आढळणारा अशा प्रकारचा ठोकळेबाजपणा, आहे तसा किंवा किंचित् मोठा करून दाखविलेला असतो, तो पाहूनच आपण हंसूं लागतों. जणूं कांहीं जडतेनें चैतन्याची तात्पुरती मुसकी बांधलेली असते. ती पाहूनच आपणास हंसूं येतें.

याच कारणामुळें एखाद्या व्यक्तीचे कांहीं आविर्भाव व अंगविक्षेप हास्यापद होतात. उदाहरणार्थ, एखादा वक्ता भाषण करीत असतां मधूनमधून खांदा उडवीत असतो अथवा मानेला झटके देत असतो. ज्या ठिकाणीं जिवंतपणाची खुली हालचाल दिसावयास हवी तेथें कळसूत्री बाहुलीची यांत्रिक करामत दिसूं लागते, तिलाच आपण हंसतों. कोणाचीहि एखाद्यानें ' नक्कल' केली म्हणजे आपण हंसतों. याचें झालें तरी कारण हेंच कीं, नकल्या माणूस, एखाद्या व्यक्तीच्या वागण्यांत निर्जीव यंत्राला शोभतील अशा ज्या लकबी वारंवार प्रगट होतात, त्यांचा अधिकच कृत्रिमतेनें कित्ता काढून दाखवितो; त्यामुळें त्या मुळाहूनहि अधिक बोजड व कळसूत्री दिसतात व हास्यापद होतात.

## प्रसंगनिष्ठ विनोद

बदल, पुरोगति आणि एकसूत्रीपणा हीं जीवनाचीं लक्षणें होत. जीवन नित्य नवा आकार घेत असतें, पुढें सरकत असतें आणि त्यामधील घटनांच्या सरणीला एकच विशिष्ट अर्थ प्राप्त झालेला असतो. याच्याउलट, यांत्रिक क्रिया तेच ते वेढे पुनःपुनः घेतात; त्यांचा क्रमहि म्हटलें तर उलटा फिरवितां येतो; त्यांचें प्रयोजनहि त्यांचें त्यांना ठरवितां येत नाहीं. अशाच प्रकारें जीवनाच्या अंगभूत घटनामध्येंहि जर पुनरावृत्ति, परावृत्ति आणि श्लेष उत्पन्न झाला तर जीवनाचें यंत्रीकरण होतें व त्याचें आपल्याला हंसूं येतें. पट्टीचे प्रहसनकार प्रसंगात्मक विनोद उत्पन्न करण्यासाठीं याच तीन माध्यमांचा प्रामुख्यानें उपयोग करतांना दिसतात. एखादा प्रसंग अथवा अन्योन्यसंबंध पुनः पुनः प्रगट झाला आहे, उलटला आहे अथवा संदर्भ बदलल्यामुळें त्याला दोन अर्थ प्राप्त झाला आहे असें ते दाखवितात त्यांमधून हुकुमी हास्याची एक ठोक बाजारपेठ करितात. पात्रांत भोंवरा उत्पन्न झाल्याप्रमाणें त्यांचा प्रवाह तेच तेच वळसे घेऊं लागला आहे असें दिसलें कीं हंसावयास आलेंच पाहिजे. आपला एखादा जुना मित्र फार दिवसानंतर एकाद्या ठिकाणीं भेटला तर आपल्याला आनंद होईल; हंसूं येणार नाहीं. पण तोच जर कां पुनः पुनः त्याच ठिकाणीं भेटूं लागला तर नक्की हंसूं येईल. एखादा परस्परसंबंध उरफाटा झाला आहे आणि जीवनांतील अपेक्षित घटनांच्या क्रमांत विचूकता उत्पन्न झाली आहे असें दिसलें म्हणजेहि हंसूं येतें. कैदी न्यायाधीशाला कायद्याचे धडे देत आहे, मुलगा बापाला व्यवहारज्ञान पाजीत आहे किंवा चोराच्या घरींच कोणी चोरी केली आहे असें पाहिल्यास अथवा ऐकल्यास हंसूं कोणाला बरें येणार नाहीं ? एखाद्या प्रसंगसरणीमध्यें जो सुसूत्रपणा अथवा एकोपा असतो तो नष्ट होऊन त्यांमधील एकादी घटना दुसऱ्या एकाद्या साखळीमध्येंहि चपखल बसूं लागली, दुहेरी झाली, दुसऱ्या बाजूनें अन्वर्थक ठरली, म्हणजेहि आपणांस हंसावयास येतें. उदाहरणार्थ, लॅबिक-( Labiche )नें आपल्या एका नाटकांत असें दाखविलें आहे कीं, एक म्हातारा ब्रह्मचारी आणि एक प्रौढ कुमारी एकमेकांचीं वर्षांनुवर्षें परिचयाचीं आहेत. एके दिवशीं आपण आपापल्या लग्नाच्या खटपटींत आहोंत अशी वार्ता तीं एकमेकांना देतात. लग्न जुळवून देणाऱ्या एकाच संस्थेशीं त्यांनीं एकमेकांपासून चोरून संधान बांधलेलें असतें. लग्न ठरेपर्यंत त्यांना अनेक अडचणी येतात. सर्व नाटकभर त्या अडचणींशीं ती एकमेकांच्या साक्षीनें झुंज देतात. अखेर दोघांचेंहि काम जेव्हां अगदीं जमून येतें तेव्हां कुठें त्यांना कळून चुकतें कीं, आपण ज्यांच्यासाठीं एवढा आटापिटा केला तीं संकल्पित वधूवरें आपणच आहोंत ! सारांश, पुनरावृत्ति, आलटापालट आणि दुपेडीपणा (repetition, inversion and reciprocal interference of two independent series ) हीं लक्षणें जीवनाच्या ठिकाणीं दिसूं लागलीं म्हणजे जीवनाचें यंत्रीकरण होतें व तेंच हास्याला कारण ठरतें.

## शब्दनिष्ठ विनोद

प्रसंगनिष्ठ विनोदाची वरील तीन वैशिष्ट्यें शब्दनिष्ठ विनोदांतहि प्रगट होतात. कारण शब्द हा खरें पाहतां एक छोटा प्रसंगच असतो. शब्दांच्या पुनरावृत्तीमुळें, आलटापालटीमुळें आणि श्लेषामुळें विनोद कसा उत्पन्न







होतो हें निराळें विशद करण्याचें कारण नाहीं. एखाद्या शब्दाचा रूढ अर्थ लक्षांत न घेतां केवळ दूरान्वयानें सूचित होणारा अर्थ त्यांवर लादणें; किंवा एखादी उपमा अगर उत्प्रेक्षा वाच्यार्थानें खरी मानणें; गंभीर विषय गांवरान भाषेंत सांगणें; मामुली गोष्टींचें भव्य शब्दांनीं वर्णन करणें; वाईट गोष्टी चांगल्या दाखविणें; जें वस्तुतः व्हावयास हवें तें झालेंच आहे असें दर्शविणें; जें आहे तें उत्तमच आहे असें व्यर्थ सूचित करणें; साध्या विषयांतहि पारिभाषिक शब्द वापरणें आणि एका विषयांतील परिभाषा भलत्याच संदर्भांत योजिणें, अशा अनेक प्रकारें शाब्दिक विनोद उत्पन्न होतो. पण त्या सर्वांचें मूळ भाषेच्या यंत्रीकरणांतच आहे. ज्या जिवंत संदर्भांत भाषा वापरली जाते त्याच्याकडे दुर्लक्ष करून एखाद्या शब्दाचा नको तो अर्थ सूचित केल्यानें, अर्थापेक्षां शब्दाला महत्व दिल्यानें आणि हव्या त्या ठिकाणीं नको तो शब्द वापरल्याने भाषेचें यंत्रीकरण होते. सारांश, जीवनाच्या यंत्रीकरणाचे जे तीन प्रकार प्रारंभीं वर्णन केले ते भाषेलाहि लागूं पडतात. आणि त्यांतूनच तीन प्रकारचा शाब्दिक विनोद उत्पन्न होतो.

## स्वभावनिष्ठ विनोद

स्वभावनिष्ठ विनोदालाहि हाच सिद्धान्त लागूं पडतो. आपल्या व्यक्तित्वाचा जो भाग ठाम किंवा पक्का झालेला असतो त्यालाच आपण स्वभाव म्हणतों. या अर्थानें स्वभावाचा चांगला अथवा वाईट कोणताहि भाग नेहमींच कमीअधिक प्रमाणांत हास्यास्पद असतो. त्यामुळें केवळ नैतिक कसोटी लागूं केल्यास स्वभावांतल्या ज्या लकबींना आपण हंसतों त्या नेहमीं वाईटच ठरतील असें नव्हे. तथापि त्यामधून व्यक्तीची असामाजिकता प्रगट होत असल्यानें तेवढ्या अर्थानें त्या नेहमीं वाईट असतात असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. तथापि नैतिक बऱ्यावाईटाचा प्रश्न येथें गौण असतो. कारण तऱ्हेवाईक व्यक्तीच्या वागण्यांतील असामाजिकतेला आपण हंसतों; अनीतीला हंसतों असें नव्हे. माणसानें परिस्थितीबद्दल नेहमीं जागरूक रहावें आणि आपल्या बांधवांशीं मिळतेंजुळतें घेऊन वागावें अशी समाजाची अपेक्षा असते. साहजिकच एखाद्याच्या वर्तनांत बेसावधपणा व अहंमन्यता दिसूं लागली कीं इतर माणसें त्याला हंसतात. धडपड्या, विसरभोळा, छांदिष्ट, एककली व अतिशय स्वप्नाळू मनुष्य विमनस्क किंवा बेसावध म्हणूनच हास्यास्पद होतो. फाजील अहंकार किंवा ताठा हा स्वभावविशेष म्हणजे तर हास्यविषयाचा जिवंत झराच होय असें म्हणावयास हरकत नाहीं. व्यक्तीच्या अंगचा अथवा मनचा लवचिकपणा संपुष्टांत आला म्हणजे ती एकारल्यासारखी वागूं लागते. परिस्थितीची व समाजाची तिला जणूं ओळख रहात नाहीं. जिवंत मनुष्याचें तात्पुरतें कां असेना यंत्रीकरण होतें व तें पाहूनच आपणास हंसूं येतें.

## हास्यविषयांतील मानवता

जीवनाचें यंत्रीकरण हें हास्यविषयाचें वैशिष्ट्य असलें तरी प्रत्येक हास्यविषय अखेर मानवी जीवनाशीं संलग्न असतो असेंहि बर्गसन्नें आवर्जून सांगितलें आहे. याचा अर्थ ज्या जीवनाच्या यंत्रीकरणाची मीमांसा येथवर केली त्याच्याभोंवतीं मानवी जीवनाची चौकट नेहमी अध्याहृत आहे असें बर्गसन्ला म्हणावयाचें आहे. हास्यविषय सर्वथा मानवी असतो, मानवी जीवनाच्या कक्षेबाहेर त्याला अर्थच असूं शकत नाहीं, या गोष्टीवर आपल्या प्रतिपादनामध्यें त्यानें ठळकपणानें भर दिलेला आहे. खोल चिकित्सा केल्यास हास्यविषय अखेर येथूनतेथून मनुष्याला चिकटलेला आहे असें दिसून येतें. हंसणारा तो मनुष्य, तसा हास्यविषयहि अखेर तो मनुष्यच असतो. मनुष्य नेहमीं मनुष्याला हंसत असतो. इतकेंच नव्हे तर विवक्षित हास्यविषयाला मनुष्यांचा एक विवक्षित संघहि अभिप्रेत असतो, असें त्याचें म्हणणें आहे. हंसणारा मनुष्य व हास्यविषय हे दोघेहि एका तात्पुरत्या संघांत सामील असतात. या संघाच्या अपेक्षेनेंच हास्यविषयाला परिपूर्ण अर्थ येतो. यामुळेंच विवक्षित संघाबाहेर विवक्षित विनोदाचें सार्थक होत नाहीं असा पुष्कळदां अनुभव येतो. आगगाडीच्या डब्यांत पुष्कळदां एकाच गांवची किंवा एकाच कुटुंबांतील मंडळी गप्पा मारीत असतात. त्यांच्यांत थट्टामस्करीला व हास्याला ऊत आलेला असतो. पण तुम्ही त्या मंडळींतले नसल्या मुळें हंसूं शकत नाहीं. यामुळेंच एका भाषेंतील विनोद दुसऱ्या भाषेंत पुष्कळदां सही सही उतरवितां येत नाहीं, असाहि दाखला त्यानें दिला आहे.

## हंसणाराच्या वृत्तीचें वैशिष्ट्य

हास्यविषयाच्या वरील वैशिष्ट्यांप्रमाणें हंसणाऱ्या



अनुक्रमणिका






माणसाचें वैशिष्ट्य त्याच्या तात्पुरत्या तटस्थ व निर्विकार मनोवृत्तींत असतें. हंसणारा मनुष्य कांहींशा व खुशालवाण्या मनःस्थितींत असावा लागतो. आपल्या भोंवतालच्या व्यक्तींचीं कांहीं सुखदुःखें व कांहीं मनोविकार थेट आपल्या अंतःकरणाला भिडतात व आपल्या चित्तवृत्ती हेलावून सोडतात. असल्या प्रसंगांतून हास्य उत्पन्न होत नाहीं. भावनाशीलतेचें, सहानुभूतीचें किंवा तन्दूपतेला पोषक असणाऱ्या वृत्तीचें गोत्र हास्याशीं जमावयाचें नाहीं. वस्तुस्थितीच्या प्रपंचांत रंगून गेलेला मनुष्य हंसूं शकणार नाहीं. हंसणारा मनुष्य जीवनाच्या व्यापांतून तात्पुरता बाजूला होऊन हास्यविषयाकडे तिन्हाईत चौकसपणानें पहात असतो. सुंदर संगीताच्या साथीवर एका सुशोभित दिवाणखान्यांत अनेक स्त्रीपुरुषांचें नृत्य चाललें आहे अशी कल्पना करा. तो सर्व देखावा अत्यंत मनोहर वाटणार यांत शंका नाहीं. नंतर तुम्ही कानावर गच्च हात झांकले आहेत असें समजा. काय होईल ? संगीत ऐकूं येईनासें होईल आणि नृत्याच्या वेड्यावांकड्या हास्यास्पद हालचाली तेवढ्या तुम्ही पहात रहाल. जीवनांतील भावनेचें संगीत बंद केलें कीं, जीवितविषय असेच हास्यास्पद होतात. हंसणाऱ्या माणसाची वृत्ति निव्वळ बुद्धिनिष्ठ असते. तीत कोणताहि अभिनिवेश अथवा भावनोत्कटता असत नाहीं. 'कसें काय हरी, बरें आहे ना ?' असें विचारणाऱ्या पृच्छकाप्रमाणें ती केवळ औपचारिक असते.

भावनाशीलतेप्रमाणें तर्कगंभीर प्रकृतीचेंहि हास्याशीं बनत नाहीं. संगति-विसंगतीची कांटेकोर चिकित्सा व बाऊ करणारा मनुष्य हंसण्याच्या मनःस्थितींत नसतो. हंसणारा मनुष्य विसंगतीचें तात्पुरतें स्वागत करण्यास सिद्ध असतो. जीवनाचें विचित्र यंत्रीकरण तो उघड्या डोळ्यानें व राजीखुषीनें पहात असतो. नव्हे, एका प्रकारच्या तात्पुरत्या मूर्खपणांत सामील होण्यासच त्याच्या मनानें तयारी केलेली असते असेंहि म्हणावयास हरकत नाहीं.

## जीवन, हास्य आणि कला

हास्याचा प्रदेश प्रत्यक्ष जीवन आणि कला यांच्या दरम्यान पसरलेला आहे. कृति आणि कला यांच्यामध्यें जो कृत्रिमतेचा प्रांत येतो तोच हास्याचा प्रांत होय. प्रत्यक्ष जीवनांत गढलेला मनुष्य बहिर्मुख आणि व्यवहारसुलभतेच्या हेतूनें मर्यादित झालेल्या दृष्टीनें सृष्टीकडे पहात असतो. त्यामुळें सृष्टीचें खरें अंतरंग त्याला दिसूं शकत नाहीं. हंसणाऱ्या मनुष्याची वृत्तीहि बहिर्मुख असते. पण जीवनाच्या प्रत्यक्ष व्यवहारांतून त्यानें अंग काढून घेतलेलें असल्यामुळें व्यवहारी दृष्टीचा तोकडेपणा तो समजूं शकतो आणि तसल्या ऱ्हस्व दृष्टीमुळें जीवनाला जें यांत्रिक स्वरूप येतें त्याची हास्यास्पदताहि त्याला जाणवूं शकते. कलावन्त त्याच्याहि पुढें मजल मारतो आणि सृष्टीच्या जिवन्त व प्रभवनशील स्वरूपाचा अंतर्मुख दृष्टीनें आपल्याच ठिकाणीं प्रत्यय घेतो.

कलावन्ताप्रमाणें हंसणारा मनुष्यहि जीवनाच्या हटातटींतून बाजूला झालेला असतो. पण तरीहि त्याची वृत्ति कलावन्ताइतकी निःस्पृह झालेली नसते. हंसणारा मनुष्य जीवनाच्या धकाधकींतून तात्पुरता मुक्त झालेला असतो, म्हणूनच त्याला हास्यांत आराम वाटतो, विसावा मिळतो, आनंद प्राप्त होतो. पण हास्यामुळें लाभणारा आनंद कलेच्या आनंदासारखा निरामय नसतो. कारण हास्य सहेतुक असतें. हास्यालाहि कांहींएक प्रयोजन असतें आणि व्यवहारांतील आनंदाप्रमाणें हास्यांतील आनंदहि त्या प्रयोजनाशींच निगडित झालेला असतो.

## हास्याचें सामाजिक प्रयोजन

हास्याचें अधिष्ठान सामाजिक तसें त्याचें प्रयोजनहि सामाजिक असतें. परिस्थितीशीं व समाजाशीं जुळत घेतल्याशिवाय व्यक्तीला जगतांच येत नाहीं. इतकेंच नव्हे तर जीवितामध्यें बस्तान मांडल्यावर देखील कोणत्याहि प्रकारें ताठरपणा दाखविणारी व्यक्ति समाजाला आवडत नाहीं. जीवनांत पदोपदीं प्राप्त होणाऱ्या परिस्थितीचें स्वरूप आकलन करून घेऊन तिच्याशीं जुळतें घेण्याचा बुद्धीचा व शरीराचा लवचिकपणा आणि आपल्या समाजबांधवांशीं मिळूनमिसळून वागण्याइतका स्वभावाचा लवचिकपणा व्यक्तीच्या ठिकाणीं असावा अशी समाजाची अपेक्षा असते. या अपेक्षेस न उतरणाऱ्या विक्षिप्त, बोजड व फुटीर संवयीच्या, स्वभावाच्या आणि वर्तनाच्या व्यक्तीस देहदंड करण्याइतका कांहीं तिचा गुन्हा मोठा असत नाहीं. म्हणून तिला थोडे चमकावण्यासाठीं समाज ज्या सौम्य शासनपद्धतीचा अवलंब करितो तिचें नांव हास्य. व्यक्तीच्या ठिकाणीं

दिसणाऱ्या कोणत्याहि यांत्रिक घोपटपणाविषयीं नापसती व्यक्त करण्याचें हास्य हें एक सामाजिक साधन आहे. व्यक्तीच्या स्वभावाचे कंगोरे झिजवून तिला सामाजिक जीवनांत रुळविण्यासाठीं समाजानें योजिलेली कानस म्हणजेच हास्य होय. हास्यास्पद मनुष्य संवयीच्या आहारीं गेलेला असतो; तात्पुरता बेसावध झालेला असतो; समोरच्या परिस्थितीला व भोंवतालच्या समाजाला तो विसरलेला असतो. त्याला चिमटा घेऊन भानावर आणावें आणि परिस्थितीची व सामाजिक जीवनाची दखल घ्यावी असा हास्याचा हेतु असतो. प्रत्यक्ष जीवनाच्या क्षेत्रांत व्यक्तीनें दाखविलेल्या फुटीरपणाला व ताठरपणाला जें स्वाभाविक व सणसणीत प्रायश्चित्त मिळायचें तें सतत मिळतच असतें. प्रत्यक्ष जीविताचा निकराच्या वातावरणानें भरलेला हा परगणा संपल्यावर, कांहींशा खुल्या वातावरणाचा हास्यप्रदेश सुरू होतो. जगण्याजोगी जागा मिळविण्यासाठीं माणसामाणसांची होणारी खेचाखेच येथें संपलेली असते. आणि जीविताची शाश्वती लाभल्यामुळें भाऊगर्दीतून सुटल्यासारखा मोकळा श्वास सोडून जो तो एकमेकाकडे केवळ कुतूहलानें पहात असतो. मात्र या प्रदेशांतसुद्धां जो मनुष्य 'मंडळीं'तला दिसत नाहीं त्याचें उणें तावडतोब निघतें; आणि जीविताच्या प्रत्यक्ष धुमश्चक्रींत सलोख्याचा व योजकतेचा जो धडा त्यानें गिरविला त्याचा विसर त्याला पडूं नये म्हणून त्याच्या विक्षिप्तपणाचा व तुसडेपणाचा मर्मभेद समाज हास्यद्वारा करीत राहतो.

याचा अर्थ हास्यास्पद व्यक्तीचें कांहीं भलें व्हावें अशा उदात्त हेतूनें प्रेरित होऊन व त्याची स्पष्ट जाणीव ठेवूनच हंसणारा मनुष्य हंसतो असें नव्हे. हास्यामध्यें दयाशीलता किंवा सूक्ष्म विवेक असत नाहीं हें मागें सांगितलेंच आहे. किंबहुना कांटेकोर न्यायीपणा व परोपकारवृत्ति यांसारखें हास्याला वावडेंच नाहीं. 'जशास तसें' या बोजड न्यायानें दोष दिसला रे दिसला कीं हास्य फटकारा ठेवून देतें. तो नेमका कुठें व किती जोरानें लागेल याची सूक्ष्म विवेचना त्यांत नसते. दोषाच्या मानानें हास्य कित्येकदां फारच कठोर अथवा फार सौम्यहि असेल. समाजाला धुडकावून लावल्यासारखा जो वागतो त्याचा पाणउतारा करावा, त्याला फजीत करावें आणि त्याला थोड्या वेदना द्याव्या अशा कांहींशा प्रतिशोधाच्या निष्ठुर हेतूनेंच समाज हास्याचा आश्रय करितो. खरोखर या मुद्द्याची खोल चर्चा करूं नये हेंच बरें! कारण जों जों अधिक चिकित्सा करावी तों तों हंसणाराची मनोवृत्ति फारशी स्पृहणीय नसते असेंच आढळण्याचा संभव आहे. स्पष्टच सांगायचें तर हास्यास्पद व्यक्तीप्रमाणें हंसणाराची वृत्ति देखील अहंमन्यतेनें किंवा चढेलपणानेंच भरलेली असते; आणि एखाद्याचे दोष सुधारण्यापेक्षां त्याला शासन घडविण्याच्या अनुदार हेतूनेंच तो हंसत असतो. यामुळें हास्य हें नेहमींच निष्ठुर, निदानपक्षीं खट्याळ व खोडकर तरी असतेंच असतें.

समुद्राच्या तळाशीं पाणी संथ व गंभीर असलें तरी त्याच्या पृष्ठभागावर लाटांचा संग्राम सुरू असतो, समपातळींत येण्यासाठीं त्यांची एकसारखी धडपड चालू असते. त्या ओघांत पांढऱ्याशुभ्र फेसाची झालर त्यांच्या भोंवतीं जमा होते. मधून मधून ह्या फेसाचे पुंजके किनाऱ्यावरच्या वाळूंत येऊन पसरतात. एखाद्या चिमुकल्या मुलानें त्या चकाकणाऱ्या फेसाचा मूठभर पुंजका जर कुतूहलानें उचलून घेतला तर क्षणार्धांत तो विरून जातो आणि खारट पाण्याचे चारदोन थेंब तेवढे हातीं उरतात. हास्य आणि हास्यास्पद घटना याचेंहि असेंच आहे. कोणत्याहि समाजाच्या चालचलणुकींत एक प्रकारची लय आलेली असते. परंतु ही लय मोडून समाजसागराच्या पृष्ठभागावर कांहीं व्यक्ती धिंगा घालीत असतात. लाटांच्या दंगलीप्रमाणें यांच्याहि वर्तनांत बेशिस्त असते; अवखळपणा असतो. लाटांच्या भोंवतीं फेस जमा होतो त्याप्रमाणें या व्यक्तीच्या तऱ्हेवाईक चाळ्यांतून हास्य पैदा होतें. हें हास्य देखील लाटांवरील फेसासारखें चकाकतें व आकर्षक दिसतें. पण खोल चिकित्सा करण्यासाठीं एखाद्या तत्त्वजिज्ञासूनें जर तें हातीं धरलें तर त्यांत आशय कमी आणि तोंडांत रेंगाळणारी त्याची चवदेखील कडवट यापलीकडे अनुभवाचा कोणताच मोठा लाभ त्याला होत नाहीं!

—








प्रा. अ. ना. देशपांडे

# कला आणि स्वातंत्र्य

वाङ्मय ही सकृत्-दर्शनीं व्यक्तिनिष्ठ स्वरूपाची गोष्ट वाटत असली तरी ती वस्तुतः एक सामाजिक शक्ति आहे. ही शक्ति निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांच्या रूपानें प्रकट होत असते आणि वाचकांच्या मनावर बऱ्या-वाईट स्वरूपाचे संस्कार करीत असते. लोकांच्या मनावर संस्कार करण्याचं वाङ्मयाचं हें कार्य योग्य दिशेनं चाललेलं आहे किंवा नाहीं, लोकांच्या वाङ्मयविषयक अभिरुचीला इष्ट वळण लागत आहे किंवा नाहीं, वाङ्मयांत समाजविन्मुख आणि अनिष्ट प्रवृत्तींचा उदो उदो होत असल्यास त्याविरुद्ध आपली प्रामाणिक व स्पष्ट प्रतिक्रिया व्यक्त करण्याइतकी जागृति सामान्य वाचकवर्गांत उत्पन्न झाली आहे किंवा नाहीं, आणि एकंदरीनें होत असलेली सगळी वाङ्मयनिर्मिति ही मानवतेच्या विकासाला उपकारक ठरतील अशा जीवनमूल्यांशीं संवाद राखणारी आहे किंवा नाहीं, या सर्व गोष्टींसंबंधीं टीकाकारानें सदैव जागृत राहिलें पाहिजे आणि त्या दृष्टीनें त्यानें आपल्या टीकेचें धोरण आणि स्वरूप ठरविलें पाहिजे. हें कार्य करण्याकरितां टीकाकाराजवळ अर्थातच निश्चित वाङ्मयीन मूल्यें असलीं पाहिजेत हें उघडच आहे. वाङ्मयीन टीकेचीं कोणतीं मूल्यें आजच्या काळीं विशेष श्रेयस्कर ठरण्यासारखीं आहेत हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाला साहित्यशास्त्रीय दृष्टीनं जसं महत्त्व आहे तसंच समाजशास्त्रीय दृष्टीनंहि आहे; आणि विशेष आनंदाची आणि समाधानाची गोष्ट ही कीं, आजच्या वाङ्मयतत्त्वविवेचकांना या प्रश्नाचं महत्त्व पटूं लागल्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. या गेल्या वर्षांत, **'वाङमयीन टीपा आणि टिप्पणी', 'साहित्य : निर्मिति व समीक्षा'** आणि **'पासंग'** हीं जीं तीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत तीं आजच्या वाङ्मयविवेचकांना या प्रश्नाबद्दल वाटणाऱ्या आस्थेचीं स्पष्ट निदर्शक आहेत.

## प्रतिभेला दिसणारी चित्राकृति

पहिलें पुस्तक प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचें आहे. वाङ्मयीन प्रश्नांबद्दल ज्यांच्या ठिकाणीं जातिवंत जिव्हाळा आहे अशा आजच्या वाङ्मयविवेचकांमध्यें प्रा. कुलकर्णी यांचें स्थान फार वरचें आणि मानाचें आहे. कुलकर्ण्यांनीं आपल्या पुस्तकांतल्या निरनिराळ्या निबंधांतून जे महत्त्वाचे दोनतीन वाङ्मयीन प्रश्न चर्चिलेले आहेत त्यांतला 'कला आणि स्वातंत्र्य' हा प्रश्न विशेष अगत्याचा आहे. कलावंतांना आणि साहित्यिकांना स्वातंत्र्याचें आकर्षण वाटावें ही अगदीं स्वाभाविक गोष्ट आहे. प्रत्येक स्वाभिमानी मनुष्य हा स्वातंत्र्यप्रिय असतो, तसाच साहित्यिकहि असतो. कलावंताला स्वातंत्र्य असावें म्हणजे काय, हा मुद्दा कुलकर्ण्यांनीं आपल्या निबंधांतून स्पष्ट केलेला आहे. त्यांचं म्हणणं असं कीं, कलावंत हा प्रत्यक्षाच्या अनुभूतीला कल्पनेच्या पातळीवर नेत असतो. त्याची प्रत्यक्षाची अनुभूति जेव्हां कल्पनेच्या पातळीवर येते तेव्हां तिचीं स्थल, काल, नाम, रूप आदीचीं बंधनें नाहींशीं होऊन तिचें व्याप्तीकरण होत असतें. या अनुभूतीला जेव्हां कलाविषय बनण्याची पात्रता येऊं लागते तेव्हां त्या कलावंताच्या प्रतिभेला तिच्यामध्यें एक चित्राकृति ( pattern ) दिसूं लागतें आणि ही चित्राकृति आपण व्यक्त केली पाहिजे असें त्याला उत्कटतेनें वाटूं लागतें. ही चित्राकृति यथोचित रीतीनें व्यक्त होईपर्यंत कलावंताची एक प्रकारची समाधि लागलेली असते, तोंपर्यंत तो कल्पनेच्या पातळीवरच वावरत असतो. ही कलानिर्मितीची क्रिया

'गेल्या वर्षांतील टीकावाङ्मय' या विषयावर ३–१२–'५४ रोजीं प्रा. अ. ना. देशपांडे यांनीं पुणें येथें महाराष्ट्र साहित्यपरिषद् पुणें येथें जें व्याख्यान दिलें त्याचा हा पहिला भाग येथें लेखरूपानें दिला आहे. राहिलेला दुसरा भाग 'नवभारता'च्या पुढील अंकांत प्रसिद्ध होईल. हें व्याख्यान 'नवभारता'करितां लेखरूपानें दिल्याबद्दल प्रा. अ. ना. देशपांडे व महाराष्ट्र साहित्यपरिषद् यांचे आभार — का. सं.








सुरूं असतांना, ती पूर्ण होण्याच्या आधींच कधीं कधीं, जाणतां वा अजाणतां, कलावंत हा कल्पनेची पातळी सोडून प्रत्यक्षाच्या पातळीवर येतो आणि अशा वेळीं त्या चित्राकृतीच्या यथोचित चित्रणाच्या दृष्टीनें आवश्यक नसलेल्या अनेक आगंतुक गोष्टी त्या चित्रणांत समाविष्ट करण्याचा त्याला मोह होतो. कुळकर्ण्यांचं आग्रहाचं सांगणं असं आहे कीं कलावंतानें आपल्या कलासमाधी-चा भंग करणाऱ्या मोहांना बळी पडूं नये. टीकाकारां-ची मागणी, लोकांची मागणी, विशिष्ट मतप्रणालीची मागणी, राजसत्तेची मागणी, प्रकाशकांची मागणी, पांरपारिकतेची मागणी – असल्या अनेक मागण्या त्याला मोह घालीत असतात; आपण संपादन केलेलें ज्ञान, आपण जमा केलेली माहिती यांचाहि कलाहीन उपयोग करण्याचा त्याला प्रबल मोह होत असतो. या आणि असल्याच सर्व मोहांना बाजूला सारून, कलानिर्मिति होईपर्यंत कलावंतानें कलेच्या एका विशिष्ट पातळीवर राहण्याचें आपलें स्वातंत्र्य अबाधित राखलें पाहिजे.

कलावंताच्या स्वातंत्र्याचा म्हणजेच एखाद्या अनु-भवसत्याच्या उत्कट चिंतनांतून प्रतीत झालेल्या चित्रा-कृतीशीं कलावंतानें इमानदार राहण्याचा हा विचार आग्रहानें, अट्टाहासानें वरचेवर पटवून देण्याचा योग्यते-चा आहे यांत शंका नाहीं; आणि या विचाराला मौलिकतेचें श्रेय देतां येत नसलें तरी त्यामुळें या विचा-राचें महत्त्व मुळींच कमी होत नाहीं. मर्ढेकरांनीं आपल्या 'वाङ्मयीन महात्मता' या पुस्तकांतून 'लेखनपूर्व आत्म-निष्ठा आणि लेखनगर्भ आत्मनिष्ठा' हा जो विचार मांडलेला आहे तो हाच विचार आहे. या ठिकाणीं सुप्रसिद्ध इटालियन तत्त्वज्ञ क्रोचे यानें आपल्या 'Aes-thetic' नांवाच्या ग्रंथांत जे कलाविषयक विचार मांडले आहेत त्यांचें स्मरण होणें अपरिहार्य आहे. त्याच्या समग्र कलाविज्ञानाचा आपल्याला येथें परिचय करून घ्यावयाचा नाहीं. आपल्या विवेचनाला पोषक असा जो त्याच्या विचारसरणींतला मुद्दा आहे तोच फक्त आपणांस येथें लक्षांत घ्यावयाचा आहे. त्याचं म्हणणं असं आहे कीं कलावंताला एखाद्या जीवनसत्याचं अंतः-प्रेरणेनं झालेलं प्रतीकात्मक दर्शन हें त्याच्या अंतरंगांत प्रथम साकार होतं. अंतःप्रेरणात्मक ज्ञानानं अंतरंगांत धारण केलेल्या या साकार स्वरूपालाच तो कलाकृति म्हणतो. पुढें, तें शब्दांच्या, रंगांच्या वगैरे साहाय्यानें कागदावर व्यक्त करणें ही केवळ बाह्य व गौण क्रिया आहे असें तो सांगतो. कुळकर्ण्यांनीं मांडलेली चित्रा-कृतीची कल्पना स्थूल मानानें याच प्रकारची आहे. या चित्राकृतीच्या यथोचित आणि प्रभावी आविष्कारा-ला आवश्यक नसलेल्या गोष्टींचा त्या आविष्कारांत समावेश होऊं न देण्याबद्दल कलाकारानें सदैव दक्ष राहिलें पाहिजे आणि ती चित्राकृति ज्या अनुभवसत्याचं प्रतीक असेल त्याच्याशीं निर्भयपणें प्रामाणिक राहण्या-इतकी स्वतंत्र वृत्ति त्यानें दाखविली पाहिजे, ही सहज मान्य होण्यासारखी गोष्ट आहे. या मुद्द्याबद्दल वाद घालण्याचं किंवा त्याचं यथार्थत्व पटवून देण्याकरितां एखादा नवीन युक्तिवाद मांडण्याचं कांहीं विशेष प्रयो-जन नाहीं.

## कलावंत पूर्ण स्वतंत्र असतो काय ?

मला मात्र कलावंताचं स्वातंत्र्य या प्रश्नाकडे जरा निराळ्या दृष्टिकोनांतून पाहणं आवश्यक आहे असं वाटतं. स्वातंत्र्य ही पूर्णपणें निरपेक्ष स्वरूपाची कल्पना आहे काय ? कलावंतच काय, पण समाजांत राहणारी कोणतीहि व्यक्ति, समाजाचा जबाबदार घटक असलेली कोणतीहि व्यक्ति पूर्णपणें स्वतंत्र राहूं शकते काय ? समाजांतल्या इतर कोणत्याहि व्यक्तीप्रमाणंच असलेला कलावंत हा आनुवंशिक संस्कारांपासून पूर्णपणें मुक्त झालेला असतो काय ? गेल्या हजारों वर्षांच्या प्रयत्नांनीं मानवजातीनं जें ज्ञानधन मिळविलेलं आहे, आपल्या मनोवृत्तींचं जें उन्नयन केलेलं आहे, त्यांच्या परिणामां-पासून कलावंत हा स्वतःला पूर्णपूर्णे अलिप्त ठेवूं शकतो काय ? कलावंत हा आपल्या व्यक्तिगत पूर्वग्रहांपासून तरी पूर्णपणें स्वतंत्र असतो काय ? भोंवतालचा राजकीय, सामाजिक, आर्थिक अशा विविध स्वरूपांच्या घटनांचे संस्कार समाजांतल्या इतर सर्व व्यक्तींवर होतात; पण कलावंताच्या व्यक्तित्वावर मात्र त्यांचा कांहीं परिणाम होत नाहीं, असं कांहीं अलौकिकत्व कलावंताच्या व्यक्तित्वांत असतं काय ? आकाशस्थ ग्रहगोलांचा सुद्धां मानवी जीवनावर परिणाम होतो असं मानतात; हें जर खरं असेल तर मग या ग्रहांच्या प्रभावापासून कलावंतांच्या व्यक्तित्वाला वेगळं काढणं योग्य होईल काय ? तेव्हां मला असं म्हणायचं आहे कीं, या आणि यासारख्याच इतर अनेक संस्कारांनीं आणि विकारांनीं, समाजांतल्या इतर व्यक्तींप्रमाणेंच कलावंताच्याहि







स्वातंत्र्याला अनेकविध मर्यादा पडलेल्या आहेत.

थोर साहित्यिक हा विकारांच्या वा पूर्वग्रहांच्या मुळींच आहारीं न जातां एक प्रकारच्या निर्विकार दृष्टीनं आणि स्थितप्रज्ञाच्या वृत्तीनं सत्यान्वेषण करीत असतो, सहृदय त्रयस्थाच्या भूमिकेवरून तो निर्भेळ सत्याचं दर्शन घडवीत असतो, हें पटवून देण्याकरितां, या मुद्द्याच्या निमित्तानें सर्वसाधारण वाङ्मयविवेचक जें उदाहरण देतात तेंच म्हणजे शेक्सपिअरचें उदाहरण कुळकर्ण्यांनीं दिलेलें आहे. कुळकर्णी ज्या दृष्टीनं शेक्सपिअरला आदर्श कलावंत समजतात, त्याच दृष्टीनं तरी शेक्सपिअर हा खरोखर आदर्श कलावंत आहे काय ? – हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. या ठिकाणीं मला आपणांस फ्रँक हॅरिसनें लिहिलेल्या 'The Man Shakespeare and His Tragic Life-story' या पुस्तकाची आठवण करून द्यावीशी वाटते. मेरी फिल्टन नांवाच्या एका सुंदर स्त्रीदेविषयींच्या अनिवार आसक्तीनं शेक्सपिअरचं एकंदर जीवन कसं पीडित किंवा प्रभावित झालं होतं, त्याच्या सुनीतांचा विषय असलेली ही 'Dark Lady' ही कृष्णसुंदरीच त्याच्या नाटकांतील निरनिराळ्या नायिकांच्या व्यक्तिचित्रांत निरनिराळ्या रूपांनीं कशी प्रतिबिंबित झालेली होती, हें हॅरिसनं आपल्या या पुस्तकांत साधार आणि सविस्तर विवेचन करून सिद्ध केलेलं आहे. शेक्सपिअरच्या व्यक्तित्वाबद्दलचा हा फ्रँक हॅरिसचा अभिप्राय त्याच्याच शब्दांत सांगणं अधिक परिणामकारक होणार आहे. त्यानं असं म्हटलं आहे कीं, 'Shakespeare's knowledge of men and women has been overrated. With all his sensuality he only knew one woman, Mary Filton, though he knew her in every mood and only one man, himself, profoundly apprehended in every accident and moment of growth." आत्यंतिक विकारवशता हा शेक्सपिअरच्या प्रतिभेचा एक महत्त्वाचा घटक होता हें सांगतांना त्यानं लिहिलं आहे : "It was his absolute abandonment to passion which made Shakespeare the supreme poet. If it had not been for his excessive sensuality and his mad passion for his 'gipsy', we should never have had from him 'Hamlet', 'Macbeth' 'Othello', 'Antony and Cleopatra' or 'Lear' - He would still have been a poet and a dramatic writer of the first rank; but he would not have stood alone above all others; he would not have been Shakespeare. ... His passion for Mary Filton lasted some twelve years ... She was Rosalind, Cressida, Cleopatra and the 'Dark Lady' of the Sonnets. All his women are parts of her or reflections of her as all his heroes are sides of Hamlet or reflections of him." हॅरिसचीं हीं वचनं आपल्यापुढं मांडण्यांत शेक्सपिअरच्या प्रतिभेतला कमीपणा दाखविण्याचा माझा हेतु नाहीं; आणि फ्रँक हॅरिसचाहि पण तसा मनोदय होता असें म्हणतां येत नाहीं. येथें लक्षांत घ्यायचा मुख्य मुद्दा हा आहे कीं शेक्सपिअरचं काय किंवा कालिदासाचं काय, या थोर कवींचं व्यक्तित्व स्थितप्रज्ञाच्या व्यक्तित्वाप्रमाणं निर्विकार स्वरूपाचं असतं असं कुलकर्णी सुचवितात तें पटत नाहीं. कलावंताचं व्यक्तित्व ही स्वतंत्र रीतीनं विकास पावणारी एक समाजनिरपेक्ष वस्तु आहे असं जर कुलकर्णी समजत असतील तर ती त्यांची समजूत मान्य करतां येत नाहीं. कलावंताच्याच नव्हे तर इतर कोणत्याहि व्यक्तीच्या व्यक्तित्वाचं स्वरूप नीट समजून घेतांना त्याचा केवळ मानसशास्त्रीय दृष्टिकोनांतून नव्हे, तर मानसशास्त्रीय व समाजशास्त्रीय अशा दोन्ही दृष्टिकोनांतून अभ्यास करणं आवश्यक आहे.

### कलावंताच्या व्यक्तित्वांतील सामाजिकता

कांहीं समाजशास्त्रज्ञ सुद्धां व्यक्तित्वाकडे केवळ मानसशास्त्रीय भूमिकेवरून पाहतात याची मला जाणीव आहे. उदाहरणार्थ, व्यक्तीच्या मानसिक प्रक्रियांची आणि अवस्थांची संघटना म्हणजे त्या व्यक्तीचें व्यक्तित्व ('The organized aggregate of psycho-







logical processes and states pertaining to the individual') अशी व्यक्तीची व्याख्या राल्फ लिंटन (Ralph Linton) यानें आपल्या 'The Cultural Background of Personality' या पुस्तकांत गृहीत धरलेली आहे. जॉन गिलिन (John Gillin) यानं आपल्या 'The Ways of Men' या पुस्तकांत व्यक्तित्वासंबंधीं लिंटनसारखीच भूमिका स्वीकारलेली आहे. त्यानं लिहिलं आहे कीं "We shall regard a personality, for present purposes, as an internal organization of emotions, attitudes, idea patterns and tendencies to overt action. This internal organization is empirically manifested in a continuity which may be called the 'style of life'". विशिष्ट स्वरूपाच्या मानसिक अवस्थांचं आणि प्रक्रियांचं संघटन म्हणजे व्यक्तित्व, हें म्हणणं एका दृष्टीनं ठीक आहे; पण त्या मानसिक अवस्थांना आणि प्रक्रियांना विशिष्ट स्वरूप प्राप्त करून देण्याच्या दृष्टीनं समकालीन सामाजिक घटना कांहीं अंशीं कारणीभूत झालेल्या असतात, मानवी जीवनाच्या शेंकडों वर्षांच्या गतेतिहासाच्याहि कांहीं खुणा त्याच्या बनावटींत उमटलेल्या असतात, हेंहि त्याबरोबर मान्य करणें भाग आहे. व्यक्तित्व आणि संस्कृति यांच्या परस्परसंबंधाविषयीं अनेक विद्वानांचीं मतं ज्यांत एकत्र प्रसिद्ध केलेलीं आहेत त्या 'Culture and Personality' या नांवाच्या पुस्तकाच्या संपादकांनीं व्यक्तित्वाची जी व्याख्या केलेली आहे, ती या दृष्टीनं स्वीकारार्ह वाटण्यासारखी आहे. त्यांनीं असं म्हटलं आहे कीं, "Personality, in brief, is an attribute which human nature acquires through participation in a given culture; it is the product of socio-cultural participation and recognition. A person, in sum, may be described as the product and agent of the socio-cultural process ... Personality is an attribute which man acquires historically through participation in socio-cultural life." समाजशास्त्राला मान्य असलेली ही व्यक्तित्वाची व्याख्या आपणांपुढें मांडण्याचा माझा हेतु उघड आहे. तो हा कीं, सर्वसामान्य माणसाच्या व्यक्तित्वाप्रमाणें कलावंताचें व्यक्तित्व हेंहि अनेक प्रकारच्या सामाजिक संस्कारांनीं प्रभावित झालेलें असतें, त्याच्याभोंवतीं अलौकिकत्वाचें आणि दिव्यत्वाचें वलय उत्पन्न करणें हें असयुक्तिक ठरतें, ही आपणांस आधींच माहित व मान्य असलेली गोष्ट पुन्हां एकदां आपल्या नजरेस आणून द्यावी. डॉ. ना. ग. जोशी यांच्या ('सत्यकथा' मार्च १९५४) 'आजच्या लेखकांपुढील समस्या' या लेखाचीहि मी आपणांस येथें आठवण करून देऊं इच्छितों. त्यांत त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं "कोणताहि साहित्यिक कितीहि श्रेष्ठ प्रतीचा असला तरी तो सामाजिक परिस्थितीचाच परिपाक असतो."

## ललितकृतीचें मूल्यमापन

कलावंताच्या व्यक्तित्वाच्या या अपरिहार्य स्वरूपाच्या सामाजिकतेचा हा मुद्दा लक्षांत ठेवून, वा. ल. कुलकर्णी यांनीं आपल्या पुस्तकांतून जो दुसरा महत्त्वाचा साहित्यशास्त्रीय विचार मांडलेला आहे त्याकडे वळावयाचें आहे. हा विचार त्यांनीं अगदीं आवर्जून, घोळून घोळून, पुनःपुन्हा मांडलेला आहे. कलेच्या स्वातंत्र्यासंबंधीं त्यांनीं मांडलेल्या विकाराशीं हा विचार पूर्णपणें सुसवादी आहे. हा विचार असा कीं, कलेचें मूल्यमापन करतांना कटाक्षानें फक्त कलामूल्यांचाच उपयोग करण्यांत यावा, अ-कलात्मक मूल्यांची लुडबुड तेथें मुळींच चालूं देऊं नये. कथा, कादंबरी, नाटक यांसारख्या एखाद्या ललित कृतीचें परीक्षण करतांना, ती 'ललितकृति' जें रूप घेऊं पाहात आहे तें रूप घेणें आणि जें व्यक्त करूं पाहात आहे तें व्यक्त करणें तिला कितपत साधलें आहे, एवढेंच पाहणें पुरेसें आहे; त्या ललितकृतींतील आशय पुरोगामी आहे कीं प्रतिगामी आहे, जीवननिष्ठ आहे कीं जीवनविन्मुख आहे, याचा विचार करणें, ती कृति ललितकृति या नात्यानें किती योग्य आहे हें ठरविण्याच्या दृष्टीनें सर्वस्वीं अप्रस्तुत आहे. कुलकर्ण्यांच्या अपार प्रीतीचा विषय झालेलीं हीं कलामूल्यें कोणतीं, याचा जर आपण त्यांच्या 'टीपा-टिप्पणीं'तून शोध घेऊं

लागलों तर आपणांस असें दिसून येतें कीं, प्रामाणिकपणा आणि संवाद हीं त्यांना मान्य असलेलीं दोन कलामूल्यं आहेत. म्हणजे असं कीं कलावंतानं आपल्याला उत्कटतेनं जाणवलेल्या अनुभवसत्याशीं इमानदार राहिलं पाहिजे आणि त्या अनुभवसत्याच्या चिंतनांतून प्रतीत झालेली जी चित्राकृति तिच्या चित्रणांत त्यानें अंतर्बाह्य सुसंगति राखली पाहिजे. निष्ठा आणि संवाद या मूल्यांचा कलामूल्यं म्हणून आग्रहानं केलेला हा पुरस्कार पाहिला म्हणजे त्यासंबंधीं एक प्रश्न लागलीच विचारावासा वाटतो. तो हा कीं, निष्ठा आणि संवाद हीं मूल्यं फक्त कलेच्याच क्षेत्रांत तेवढीं नियामक आणि प्रमाणभूत ठरतात आणि जीवनाच्या इतर क्षेत्रांत मात्र ती कवडीमोल मानलीं जातात, हें वा. ल. कुलकर्ण्यांना कोणीं सांगितलं ? हीं मूल्यं कलेच्या क्षेत्रांत जशीं कार्यक्षम आणि उपकारक ठरतात तशींच सर्वसामान्य माणसाच्या जीवनाचं उन्नयन करण्याच्या दृष्टीनंहि तीं तितकींच प्रभावी आणि उपयुक्त ठरतात, हें काय कुलकर्ण्यांना माहीत नाहीं ? मग, या मूल्यांवर 'खास कलेचीं' असं शिक्कामोर्तब करण्याची त्यांना कशी बरें बुद्धि झाली ? मला वाटतं असं झालं असावं कीं इतर अनेक वाङ्मयतत्त्वविवेचकांनीं या मूल्यांचा खास कलामूल्यं म्हणून प्रचार व पुरस्कार केला आणि कुलकर्ण्यांनीं याच विचारसरणीचा आपल्या लेखांतून अनुवाद केला. दुसऱ्यांच्या – विशेषतः पाश्चात्त्यांच्या विचारांचा अनुवाद करणं हा कुळकर्ण्यांच्या प्रतिभेचा प्रकृतिधर्मच आहे ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे कुलकर्ण्यांनीं जें केलें त्यांत ते आपल्या प्रकृतीशीं प्रामाणिक राहिले याबद्दल त्यांना मनःपूर्वक धन्यवादच दिले पाहिजेत. असो.

ललितकलाकृतीच्या मूल्यमापनांत निष्ठा आणि संवाद हीं मूल्यं प्रमाण मानूं नयेत असं माझं म्हणणं नाहीं; माझं म्हणणं असं आहे कीं हीं दोनच मूल्यं तेवढीं प्रमाण मानूं नयेत, त्यांना आणखी एका तिसऱ्या मूल्याची जोड द्यावी. हें तिसरं मूल्यं कोणतं ? हें तिसरं मूल्य कलावंताच्या व्यक्तित्वाच्या इयत्तेवर आधारलेलें आहे. व्यक्तित्व ही सामाजिक वस्तु आहे आणि त्यामुळें त्याची महत्ता व नीचता ही जीवनमूल्यांनींच ठरवितां येण्यासारखी आहे. अर्थातच कोणत्याहि कलावंताची योग्यता ठरवितांना, या तीन मूल्यांवर आधारलेले तीन प्रश्न त्याला उद्देशून विचारले पाहिजेत: कलावंत हा आपल्या अनुभवसत्याशीं कितपत इमानदार आहे ? कलावंत हा त्या अनुभवसत्याच्या चिंतनांतून प्रतीत झालेल्या चित्राकृतीशीं कितपत इमानदार आहे ? आणि कलावंत हा मानव जातीच्या हजारों वर्षांच्या प्रयत्नांचं फलस्वरूप असलेलीं जीं उच्च व उदात्त अशीं जीवनमूल्यं त्यांच्याशीं कितपत इमानदार आहे ? – निष्ठा आणि संवाद या पहिल्या दोनच मूल्यांविषयीं फक्त आग्रह धरला आणि तिसऱ्या मूल्याविषयीं उपेक्षा दाखविली तर केवढा अनवस्थाप्रसंग ओढवेल याची सहज कल्पना येण्यासारखी आहे. समजा, उद्यां एखाद्या भारतीय साहित्यिकाच्या अंतःकरणांत असा विचार उदयास आला कीं पाकिस्तानचे दोन भाग एकमेकांपासून फार दूर आहेत; त्यामुळें त्यांना राज्यकारभाराच्या दृष्टीनें व राष्ट्राला एकसंध स्वरूप आणण्याच्या दृष्टीनें फार त्रास होतो; हा त्यांचा त्रास कमी व्हावा म्हणून उत्तर हिंदुस्थानांतला एक लांबच्या लांब पट्टा तोडून द्यावा. हा विचार जर त्याला उत्कटतेनं जाणवला आणि त्याच्या अखंड चिंतनांतून जर त्याला दृश्यांची एक मालिका, एक चित्राकृति दिसूं लागली तर अशावेळीं निष्ठा आणि संवाद या कलामूल्यांचा हवाला देऊन आणि कलावंतांच्या स्वातंत्र्याचा बाणा इरेस घालून त्यानें ती चित्राकृति कथा, कादंबरी, नाटक यासारख्या ललित कृतीच्या रूपानं साकार करणं योग्य होईल काय ? ज्या विशिष्ट भारतीय कलावंताच्या अंतःकरणांत असा विचार तीव्रतेनं उदयास येईल त्याच्या व्यक्तित्वाचं राष्ट्रद्रोही स्वरूप आपोआपच उघडकीस येईल.

## साहित्यिकांची सामाजिक जबाबदारी

कलावंताला जे विचार, ज्या कल्पना सुचतात त्यावरून त्याच्या व्यक्तित्वाचं स्वरूप ठरविलं जाईल; आणि हें स्वरूप ठरविण्याकरितां जीवनमूल्यांचाच आश्रय घ्यावा लागेल. हा प्रयोग आपणांस एखाद्या विद्यमान कवीवर करून पाहतां येण्यासारखा आहे. या कामाकरितां सुहृदचंपेची म्हणजे श्री. पु. शि. रेगे यांची निवड केलेली आपणांस आणि विशेषेंकरून प्रा. वा. ल. कुलकर्णी यांस पसंत पडेल असें मला वाटतें. आपल्या सुदैवानें श्री. पु. शि. रेगे यांनीं आपल्या स्वतःच्या व्यक्तित्वावर प्रकाश टाकणारा 'माझ्या काव्याची भूमिका' या नांवाचा एक लेख 'सत्यकथे'त

( फेब्रुवारी १९५४ ) लिहिलेला आहे. भोंवतालच्या घटना आणि संघर्ष आपल्या प्रतिभेला चेतवूं शकत नाहींत, आपल्या प्रतिभेला चेतवूं शकेल अशी एकच वस्तु आहे आणि ती म्हणजे स्त्रीदेह, अशी रेग्यांनीं त्या लेखांत स्पष्ट कबुली दिलेली आहे. सगळी सामान्य जनता आळोखेपिळोखे देऊन जागृत होते आणि आपल्या कार्यशक्तीचे नवे नवे उन्मेष प्रकट करते; पण रेग्यांचें मात्र तिकडे लक्ष जात नाहीं. त्यांना दुसऱ्या-च कोणाचे तरी आळोखे – पिळोखे दिसतात आणि म्हणून ते लिहितातः " डोकावले देतांना तूं । बाळे ! आळोखे-पिळोखे । डाव्या बाहींतून दोन । कुणी चुकुर नवखे !" रेग्यांच्या कवितेचं मूल्यमापन करतांना त्यांच्या व्यक्तित्वाचं हें स्त्रीलंपट स्वरूप लक्षांत घेणं आवश्यक आहे. रेग्यांच्याच काय, कुणाच्याहि कवित्वा-चं आणि वाङ्मयाचं परीक्षण करतांना त्यांतून प्रकट झालेल्या व्यक्तित्वाची प्रत, जीवनाचीं शाश्वत स्वरूपाचीं अशीं जीं उच्च आणि उदात्त मूल्यें आहेत तीं लक्षांत घेऊनच, लावली पाहिजे. प्रत्येक साहित्यिकाला नाना प्रकारचे अनुभव येत असतात, निरनिराळे विचार निर-निराळ्या कल्पना सुचत असतात. पण वाङ्मयविषय बनविण्याकरितां त्यांतून तो ज्या अनुभवांची, ज्या विचा-रांची, ज्या कल्पनांची निवड करितो तीवरून त्याच्या व्यक्तित्वाचें स्वरूप कळून येतें. ज्या अनुभवांचें, विचा-रांचें, वा कल्पनांचें चित्रण सामाजिक दृष्टीनं निषेधार्ह आहे त्यांचेंच फक्त तीं तथाकथित कलामूल्यं सांभाळून चित्रण करणारा साहित्यिक हा आपली सामाजिक जबाबदारी विसरला आहे असं म्हणावं लागतं. वाङ्मया-चा वाचकांच्या मनावर आणि पर्यायानं समाजावर बरावाईट परिणाम होतो ही गोष्ट आज ठांसून आणि आर्जवून सांगणं अत्यंत आवश्यक झालं आहे. वाङ्म-याची सामाजिकता मान्य नसलेल्यांनीं रसास्वादाच्या ठिकाणीं जी अलौकिकता कल्पिलेली आहे, तिची भ्रामकता पटवून देण्याची आज वेळ आलेली आहे. ते थिऑसॉफिस्ट सांगत असतात ना कीं व्यक्तीच्या मनांत उत्पन्न झालेल्या विचार-विकारांचे कंप सर्वत्र मनोजगतां-(Mental World) मध्यें उठत असतात तें अगदीं खरें आहे. त्या दृष्टीनें पाहतां, आजचे नांवाजलेले साहित्यिक आपली सामाजिक जबाबदारी सांभाळण्या-विषयीं फारसे दक्ष नाहींत असं नाइलाजानं म्हणावं लागतं. आपणापुढं या संबंधींचीं एक-दोनच उदा-हरणं ठेवतों. या वर्षाच्या एका दिवाळीअंकांत श्री. पु. भा. भावे यांची ' सुगंध ' ही कथा आलेली आहे. या कथेंतील नायकाचं वर्तन अत्यंत उच्छृंखल आणि उत्तान आहे. तो आपल्याकडे एका राऊताईणीला नोकरीला ठेवतो व तिच्याशीं तो सर्व प्रकारच्या शृंगारिकतेचा उपभोग घेतो. पुढें ती राऊताईण जाते. कांहीं दिवसांनीं, नायकाच्या शारीरिक वासना पुन्हा खवखवल्या असतांना तो दुसऱ्या राऊताईणीला आपल्या खोलींत आणतो व तिचा उपभोग घेतो. पहिल्या राऊताईणीची त्याच्यावर निष्ठा होती असं या कथेंत दाखविलं आहे; पण सबंध कथेंत नायकाच्या एकंदर उच्छृंखल व उत्तान वर्तनाचा जो अप्रत्यक्षपणें गौरव केलेला आहे तो निश्चित आक्षेपार्ह आहे. उग्र विषाच्या अनुपानांतून अमृत-रसाचा एखादा कण चाटवण्यासारखा या कथेचा प्रकार झालेला आहे. कांहीं तरुणांना त्या राऊताईणीची निष्ठा स्तुत्य वाटेल, पण त्याबरोबरच नायकाचं वर्तन त्यांना अनुकरणीय वाटण्याचाहि संभव आहे.–अरविंद गोखले यांची ' डाग ' नांवाची कथा हीहि या वर्षीच्या दिवाळी-अंकांत प्रसिद्ध झालेली आहे. त्यांत एक जोडपं आहे. पत्नीला लग्न होऊन अनेक वर्षं होऊन गेलीं तरी मूल होत नाहीं. आपल्याला मूल व्हावं असं तिला फार वाटतं आणि त्यापायीं तिच्या हातून पाप घडतं. एके दिवशीं तिचा नवरा बाहेरगांवीं जातो; त्याच वेळीं त्याचा एक मित्र घरीं येतो; नवऱ्याकडून आपल्याला मुलगा होणें शक्य नाहीं असं वाटल्यावरून ती त्या मित्राकडून आपली इच्छा पूर्ण करून घेते. इकडे नवरा परत येण्याच्या आधींच तो मित्र निघून जातो. पुढें त्या स्त्रीला मुलगा होतो. नवरा मरतो. मुलगा मात्र बापासारखाच निघतो. हा आपल्या नवऱ्यापासूनच झाला आहे अशी तिची खात्री पटते व आपण त्या परपुरुषाबरोबर व्यभिचार करून उगीच आपल्या शीलाला डाग लावून घेतला याबद्दल तिला सारखी खंत वाटत राहते. या गोष्टींत दोन संस्कार आहेत. एक पतिनिष्ठेचा व दुसरा, पुत्र-प्राप्तीकरितां केलेल्या पापाचा. त्यांपैकीं कोणता संस्कार अधिक प्रबळ आहे ? पहिलाच संस्कार अधिक प्रबळ वाटेल अशा रीतीनें ही कथा लिहिण्यांत आली आहे










काय ? समजा, मूल न होणाऱ्या एखाद्या विवाहित स्त्रीनें जर ही कथा वाचली तर तिच्या मनावर व परिणामीं आचरणावर या कथेचा काय परिणाम होईल ? या कथेचं मूल्यमापन करतांना, कलामूल्यांबरोबरच असल्या प्रश्नांचींहि उत्तरं शोधण्याचा प्रयत्न झाला पाहिजे.

## टीकापद्धतीचें जीवनविन्मुख स्वरूप

कलेकडे पाहण्याची ही सामाजिक व सांस्कृतिक दृष्टि वा. ल. कुलकर्ण्यांच्या टीकालेखांत आढळत नाहीं. कुलकर्णी जेव्हां रससंबंधीं विवेचन करतात तेव्हां ते कलाकृतींतील अंतर्गत सुसंगतीवरच फक्त आपलं लक्ष वेधतात; हजारों वर्षांच्या अनुभवानंतर मानवजातीनं जीं उच्च सांस्कृतिक मूल्यं आपल्यापुढं आदर्श म्हणून ठेवलीं आहेत आणि जीं मूल्यं आपल्या जीवनांत साकार व सार्थ करण्याकरितां सारी मानवजात अव्याहत धडपडत आहे, त्या मूल्यांशीं संगति राखण्याची कुवत कलाकृतींत आहे किंवा नाहीं, त्या कलाकृतीच्या निर्मात्याचं व्यक्तित्व हें त्या जीवनमूल्यांनीं संस्कारित झालेलं आहे किंवा नाहीं, या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं मात्र ते मुग्ध राहतात. वस्तुतः रसाचा विचार करतांना, याच्याहि पुढं जाऊन, रसव्यवस्थेला मान्य असलेलीं वाङ्मयीन मूल्यं हीं कोणत्या विशिष्ट समाजव्यवस्थेचा अपरिहार्य परिपाक आहेत आणि एकंदरीनें रससिद्धान्त हा सामाजिक परिणामांविषयीं कसा उदासीन आहे याचाहि विचार करावयास पाहिजे; पण अकलात्म मूल्यांवर बहिष्कार टाकणाऱ्या वा. ल. कुलकर्ण्यांकडून असल्या मूलगामी व जीवनसापेक्ष प्रश्नासंबंधीं विवेचन अपेक्षिणें व्यर्थ आहे. कुलकर्ण्यांनीं थोडेसें जें चिपळूणकरांच्या लेखनशैलीसंबंधीं लिहिलें आहे त्यांतहि त्यांच्या टीकापद्धतीचं जीवनविन्मुख स्वरूपच प्रकट झालेलं आहे. चिपळूणकरांच्या शैलीचं वैशिष्ट्य कुलकर्ण्यांना त्यांच्या वक्रोक्तिप्रेमांत दिसून आलं; पण त्या वक्रोक्तीच्या मुळाशीं, त्या वक्रोक्तींतून चिपळूणकरांनीं व्यक्त केलेल्या नानाप्रकारच्या विचारांच्या नि विकारांच्या मुळाशीं त्यांचा देशाभिमान कसा कार्यकर झालेला आहे, हें कुलकर्ण्यांच्या कलात्मक टीकादृष्टीला दिसलं नाहीं आणि तें त्यांना न दिसणं हें अस्वाभाविकहि नाहीं.

कुलकर्ण्यांच्या टीकापद्धतीची असामाजिकता आणखीहि एका रीतीनं प्रकट झालेली आहे. या दृष्टीनं त्यांचा तुकारामाच्या कवितेवरील लेख वाचण्यासारखा आहे. या लेखांतील हीं वाक्यें पहा: " त्यांतील ring of Sincerity आपल्या मनाला एकदम पटल्याखेरीज राहत नाहीं. ", " ज्ञानेश्वरी वाचतांना missing the wood for the tress हा अनुभव पुष्कळदां आपल्या वांट्यास येतो तो ह्यामुळेंच. ", " भरघोंसपणा हें तिचें वैशिष्ट्य आहे. It is a full-throated expression " - मराठी संतवाङ्मयाचं विवेचन करीत असतांना पाश्चिमात्य कवींचीं आणि विचारवंतांचीं समर्पक वचनं उद्धृत करणं ही कांहीं वावगी गोष्ट नाहीं; पण मराठी संतवाङ्मयासंबंधीं मराठी वाचकांकरितां मराठी भाषेतून लेख लिहीत असतांना मराठीच्या प्राध्यापकानं अगदीं सहज रीतीनं आणि अपरिहार्यपणें साधे इंग्रजी शब्द आणि साधीं इंग्रजीं वाक्यें, आपलें प्रतिपादन विशेष प्रभावी व्हावें, म्हणून वापरावीं, ही गोष्ट एक प्रकारच्या असामाजिकतेची निदर्शक नाहीं काय ? वा. ल. कुलकर्ण्यांच्या पुस्तकाचा परामर्श एवढ्या विस्तारानें मीं मुद्दामच घेतलेला आहे; कारण, कलाकृतींच्या परीक्षणांत, कलावंताची आत्मनिष्ठा आणि त्याला प्रतीत झालेल्या चित्राकृतीच्या चित्रणांतील सुसंगति या दोनच मूल्यांना प्रमाण मानावयाचें आणि कलावंताला सामाजिक जबाबदारींतून पूर्णपणें मुक्त करावयाचें, ही जी प्रवृत्ति आजच्या मराठींतल्या समीक्षाशास्त्रांत बळ धरूं पाहात आहे आणि जिचा कुलकर्ण्यांनीं आपल्या पुस्तकांतून अत्यंत आस्थापूर्वक व विशेष विस्तारपूर्वक पाठपुरावा केलेला आहे आहे तिचा मला स्पष्टपणें निषेध करावयाचा आहे. स्वतंत्र भारतांतल्या सर्व लोकांनीं—कामगारांनीं, किसानांनीं, कारकुनांनीं, शिक्षकांनीं, सैनिकांनीं — साऱ्यांनीं आपलीं सामाजिक कर्तव्यें निष्ठेनें पार पाडावयाचीं, शास्त्रज्ञांनींसुद्धां, परवा नेहरू म्हणाले त्याप्रमाणें, आपलं संशोधन राष्ट्रहितदृष्टीनें चालवावयाचें, पण मराठी साहित्यिकांनीं मात्र कोणत्याहि प्रकारच्या सामाजिक वा राष्ट्रीय कर्तव्याच्या जबाबदारींतून सदैव मुक्त रहावयाचें ! ही प्रवृत्ति निस्संशय घातुक आहे.

## आज वाढलेली सामाजिक जबाबदारी

यांत्रिकतेचा प्रत्यहीं विकास होत असलेल्या आज








च्या या समाजांत समाजाच्या प्रत्येक घटकानें संयम पाळणें किती आवश्यक आहे हें सांगतांना कार्ल मॅनहेम् - ( Karl Mannheim )नें आपल्या 'Man and Society in an Age of Reconstruction' या पुस्तकांत म्हटलें आहे कीं " The contemporary social order must collapse if rational social control and the individual's mastery over his own impulses do not keep step with technological development. " आज व्यक्तीची समाजासंबंधींची जबाबदारी वाढलेली आहे आणि पुढें ती आणखी वाढतच जाणार आहे याची तीव्र जाणीव करून देतांना कार्ल मॅनहेमनें आपल्या पुस्तकाच्या 'Real undertanding of freedom' या शेवटच्या प्रकरणांत समारोप करतांना लिहिलें आहे कीं — " Rightly understood, recent tendencies towards a a mass society and our ever-increasing awareness of the determinism of sociological factors do not release us from responsiblity for the future; responsibility increases with every advance in the course of history and it has never been greater than it is to-day. " उद्यांच्या संस्कृतीच्या निर्मितींत साहित्यिकांना सहभागी व्हावयाचें आहे आणि " साहित्य ही संस्कृति रचणारी एक महान् शक्ति होय " ही तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत व्यक्त केलेली अपेक्षा मराठी साहित्यिकांना खरी करून दाखवावयाची आहे. साहित्यिकाला स्वातंत्र्य अवश्य द्यावें; विचारांचें द्यावें, व्यक्तीकरणांचेंहि द्यावें; पण त्याचबरोबर माझी अत्यंत आग्रहाची सूचना अशी कीं साहित्यिकाची प्रत लावतांना, आधीं त्याच्या साहित्यांत प्रकट झालेल्या त्याच्या व्यक्तित्वाची उच्च व उदात्त अशा सनातन जीवनमूल्यांच्या आणि सामाजिकतेच्या साहाय्यानें प्रत लावावी आणि मग त्याच्या व्यक्तित्वाचा सांस्कृतिक दर्जा लक्षांत घेऊन त्याची साहित्यिक म्हणून योग्यता ठरवावी.

---

## सैतान — !

अवचित जागा होई
      रूप मायावी घेऊन
माझ्या मनांत बसला
      असा सैतान लपून

त्याची बेरंगी दुनिया
      त्याचें मोहमयी जाळें
गुरफटती, गुंतती
      त्याच्या पाशांत पाऊलें

रंग तयाचे आहेत
      अहो ! मादक फसवे
प्रलोभनांत तयाच्या
      मन माझें कां विरावें ?

त्याच्या आमिषांना नाहीं
      कधीं फसलें हें मन
आजवर नव्हतेंच
      कधीं त्याचें प्रलोभन !

– परी आज मन बुडे
      त्याच्या कुटिल अंतरीं
कशी आज मोह घाली
      त्याची मायावी नगरी

फिरफिरुनी विचारी
      काय मला माझें मन–
'ज्यानें निर्मिलें हें जग ,
      त्यानें निर्मिला सैतान ?

स्वामी हंसऱ्या विश्वाचा
      कसा सैतान निर्मील ?
विश्व-मंगल-स्वरूपीं
      विष कसें कालवील ?'

कांहीं कळेना , वळेना
      गेलों स्तिमित होऊन
माझ्या मनांत बसला
      असा सैतान लपून !

— सूर्यकांत खाण्डेकर







डॉ. कृ. भि. कुलकर्णी

# मेजर टॉमस कँडी

" Now that great efforts are being made to promote education and to raise a native literature, we must be particularly careful not to encourage or sanction bad composition. If the Marathas were an educated people, well-acquainted with rules of composition, and if they had a standard literature, an inelegant or ungrammatical work might safely be left to the fate to which the public taste and perception of propriety would doom it."

एकोणिसाव्या शतकांत ' मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ' झाला. तो देण्यास ज्यानें सुमारें पन्नाससाठ वर्षे अविरत परिश्रम घेतले त्या मेजर टॉमस् कँडीनें वरील विचार व्यक्त केले आहेत.

## मोल्स्वर्थचा मदतनीस

टॉमस् कँडी याचा जन्म इंग्लंडमध्यें ता. १३ डिसेंबर, इ. स. १८०४ रोजीं झाला. विद्यार्थिदशा संपल्यावर त्यानें लष्करी खात्यांत शिरकाव करून घेतला. जॉर्ज व टॉमस् कँडी हे जुळे बंधू. हिंदुस्थानांत येण्यापूर्वी त्यांनीं बोर्थविक् गिलख्राइस्ट ( Borthwick Gilchrist ) याच्या हाताखालीं इंग्लंडमध्यें ओरिएन्टल इन्स्टिट्यूशनमध्यें हिंदुस्थानी भाषेचा अभ्यास करून तींत प्रावीण्य मिळविलें होतें. हिंदुस्थानी भाषा टॉमस् कँडीला चांगली येत असल्यामुळें दहाव्या नेटिव इन्फंट्रींत दुसऱ्या बॅटॅलियनमध्यें त्याची दुभाषी व क्वॉर्टरमास्टर म्हणून नेमणुक होण्याबद्दल शिफारस झाली. याचवेळीं त्यानें मराठी भाषेची परीक्षा दिल्यामुळें दुभाष्याच्या जागेसाठीं त्यास योग्य ठरविण्यांत येऊन त्याची त्या जागेवर नेमणूकहि करण्यांत आली. या ठिकाणीं एक गोष्ट नमूद करणें आवश्यक आहे कीं, हिंदुस्थानांत येण्यापूर्वी ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरांना इंग्लंडमध्यें हेलिबेरी कॉलेजांत एतद्देशीय भाषांचा अभ्यास करावा लागे. या कॉलेजांत संस्कृत, फारशी, उर्दू, बंगाली इत्यादि भाषांचा अभ्यास केला जात असे. या कॉलेजमधील विद्यार्थ्यांना मराठी भाषेची तांत्रिक माहिती प्रो. ईस्टवुइक खाजगी रीत्या देत असत.

हिंदुस्थानी व मराठी या दोन भाषा जाणणारा टॉमस कँडी जेव्हां एक लष्करी अधिकारी म्हणून हिंदुस्थानांत आला तेव्हां जेम्स मोल्स्वर्थ नामक दुसरा एक लष्करी अधिकारी मराठी भाषेचा कोश रचण्याच्या विचारांत होता. दोघेहि समव्यवसायी असल्यामुळें त्यांचा परस्परसंबंध आला व सुरू केलेल्या मराठी-इंग्रजी शब्दकोशाच्या कामांत मदत व्हावी म्हणून मोल्स्वर्थनें कँडीबंधूंना इ. स. १८२६ मध्यें सरकारी संमतीनें आपल्याकडे बोलावून घेतलें. या वेळेपासून मराठी भाषा व वाङ्मय यांच्याशीं टॉमस् कँडीचा संबंध आला व तो त्यानें आमरण टिकविला. मराठी-इंग्रजी कोशाचें काम चालू असतां तो आजारी पडून इ. स. १८२९ पासून इ. स. १८३२ पर्यंत मायदेशीं गेला. तिकडून परत आल्यावर त्यानें मोल्स्वर्थला इंग्रजी-मराठी कोशरचनेमध्यें मदत करावयास सुरवात केली. इ. स. १८३५ पर्यंत हें काम चाललें. पण यावेळीं मोल्स्वर्थ आजारी पडला व कोशाचे सर्व कागदपत्र घेऊन तो इंग्लंडला गेला. तिकडे कोशाचें कार्य आपण पुरें करूं अशी मोल्स्वर्थची कल्पना होती. तथापि तें काम तसेंच अर्धवट पडून राहिलें. पुढें इ. स. १८४० मध्यें सरकारी विनंतीवरून टॉमस् कँडीनें तें हातीं घेतलें व इ. स. १८४७ मध्यें इंग्रजी-मराठी शब्दकोश तयार झाला.

## शिथिल कारभाराचा आरोप

तत्पूर्वी इ. स. १८३७ मध्यें कँडीची पुण संस्कृत कॉलेजचा सुपरिंटेंडेंट व मराठी शाळांचा तपासनीस म्हणून नेमणूक झाली होती. वर उल्लेखिलेल्या इंग्रजी-मराठी कोशाचें कार्य व्यवस्थित व्हावें म्हणून इ. स. १८४० मध्यें शाळातपासणीचें काम त्याच्याकडून










काढून घेण्यांत आलें होतें. संस्कृत भाषेचा विशेष अभ्यास नसतांना सुद्धां पुणें संस्कृत कॉलेजचा सुपरिंटेंडेंट म्हणून तो काम करीत होता. या जागेवर त्यानें इ. स. १८५६ पर्यंत, म्हणजे सुमारें वीस वर्षें काम केलें. त्याच्याच प्रेरणेनें इ. स. १८५१ मध्यें पुण्याची संस्कृत पाठशाळा व इंग्रजी शाळा एकत्र केली गेली. या जोडसंस्थेंत संस्कृत, इंग्रजी व मराठी या तीनहि भाषांचा अभ्यास होत असे. कृष्णशास्त्री चिपळुणकर या संस्थेमध्यें मराठीचे प्राध्यापक होते.

कॉलेजचा सुपरिन्टेंडेंट म्हणून काम करीत असतांनाच कँडीची इ. स १८४७ मध्यें 'मराठी ट्रॅन्स्लेटर अँड रेफरी' म्हणून नेमणूक झाली. आमरण तो या हुद्द्यावर होता. इ. स. १८५६ मध्यें आजारीपणामुळें तो मायदेशीं गेला. रजेवर जाण्यापूर्वी त्यानें सरकारकडे अशी विनंति केली कीं, सुपरिन्टेंडेंट आणि मराठी ट्रॅन्स्लेटर या दोन्हीं जागा एकट्यानें सांभाळणें आपणास जड जातें; ऑक्स्फोर्ड विश्वविद्यालयाचा एखादा पदवीधर कॉलेजचा प्राचार्य म्हणून आणावा व मराठी ट्रॅन्स्लेटरचें काम आपण अवश्य करूं.

इतक्यांत इ. स. १८५५ मध्यें शिक्षणखात्यांत बरेचसे बदल झाले. हे बदल घडवून आणण्यापूर्वी सरकारनें एक समिति नेमून न्यू पूना कॉलेजची तपासणी केली. तींत अनेक भानगडी उघडकीस आल्या. कॉलेजमधील अनिर्बंध वातावरण हा कडक तपासणीचा विषय झाला. या तपासणींत कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक कृष्णशास्त्री चिपळुणकर यांच्यावर गंभीर आरोप ठेविले गेले व त्यांच्या अनैतिक वर्तनामुळें त्यांना कामावरून चार महिने दूर केले गेले. या सर्व गोष्टी मेजर कँडीच्या शिथिल कारभारामुळें होतात असा समितीचा ग्रह झाला व तिनें सरकारला सुचविलें कीं कँडीला कॉलेजचा सुपरिन्टेंडेंट म्हणून यापुढें काम करूं देऊं नये. कँडीनें आपण निर्दोष असल्याद्दल आपली बाजू मांडली; पण त्याचा उपयोग झाला नाहीं. व इंग्लंडहून परत आल्यावर इ. स. १८५७ पासून फक्त मराठी ट्रॅन्स्लेटर म्हणून तो काम करूं लागला.

मेजर कँडीला हा मोठाच धक्का बसला. वास्तविक तो स्वतः शिस्तीचा मोठा भोक्ता होता. त्याचे मदतनीस परशुरामपंत गोडबोले यांना सुद्धां त्यांनीं सरकारी छापखान्यांतील व्यवहारांत केलेल्या अप्रामाणिक वर्तणुकीबद्दल त्यानें कामावरून काढून टाकलें होतें व पुढें त्याच्याच रदबदलीमुळें तात्यांची पन्नास रुपये दंडावर सुटका झाली होती. त्याच कँडीवर वरील प्रसंग ओढवला.

अशा प्रकारें स्थानभ्रष्ट झालेल्या कँडीचें आर्थिक दृष्ट्याहि फार मोठें नुकसान झालें. दरमहा सहाशें रुपये पगारावरून दोनशें सदुसष्ट रुपयांवर त्याला काम करावें लागलें. न कुरकुरतां इ. स. १८६३ पर्यंत त्यानें ही पगारकपात सहन केली व तदनंतर आपली बाजू सरकारकडे मांडिली. वास्तविक शिक्षणक्षेत्रांत काम करणें शक्य व्हावें म्हणून त्यानें लष्करी नोकरींत काम करण्यास असमर्थ असल्याचें इ. स. १८५० मध्यें ठरवून घेतलें होतें. इ. स. १८६३ मध्यें बेचाळीस वर्षांच्या दीर्घ नोकरीनंतरची कँडीची ही आर्थिक हलाखी पाहून सरकारनें त्याची 'Classifier of Records' म्हणून नेमणुक करून त्याला या कामाबद्दल दरमहा तीनशें रुपये देण्याचें ठरविलें. इ. स. १८५७ मध्यें निर्माण झालेल्या राजकीय परिस्थितीशीं हिंदुस्थान-सरकार झगडत असल्यामुळें कँडीनें आपल्या अडचणी कांहीं काळ सरकारपुढें मांडिल्या नव्हत्या. पुढें पुन्हां एकदां त्यानें सरकारकडे आपल्या आर्थिक नुकसानीचा पाढा वाचला व त्यामुळें त्याला इ. स. १८६५ मध्यें त्याच्या मराठी क्रमिक पुस्तकांच्या रचनाकार्याबद्दल तीन हजार रुपये बक्षिस म्हणून मिळाले.

मेजर कँडीनें इ. स. १८४७ पासून इ. स. १८७६ पर्यंत मराठी ट्रॅन्स्लेटर म्हणून काम केलें. या सुमारें तीस वर्षांच्या मुदतींत त्यानें स्वतः कांहीं शालेय पुस्तकें लिहिलीं व इतरांनीं लिहिलेलीं पुस्तकें तपासण्याचें काम केलें व अनेक भाषांतरकार त्यानें तयार केले. या काळांत त्याच्या प्रयत्नामुळें मराठी गद्याचें स्वरूप पालटलें. त्यानें जीं शेंकडों पुस्तकें बारकाईनें तपासून त्यांवर अभिप्राय दिले आहेत त्यांतील कांहीं पुस्तकांवरील अभिप्राय मुद्दाम येथें देत आहे. त्यांवरून कँडीच्या विशेष प्रयत्नांमुळें मराठी गद्याला सुसंघटित वळण कसें व कां लागलें त्याची थोडीशी कल्पना येऊं शकेल.

## तपासण्यांतील बारकावा

बाळशास्त्री जांभेकर यांच्या 'हिंदुस्थानाचा इतिहास' ( १८४६ ) या पुस्तकावरील टीकालेखांत कँडी लिहितो :








" The blemishes of the work are inattention to the rule of grammar respecting the past tense of transitive verb when both the agent and the object are inflected, the use of some vulgar phrases and idioms, and confusion arising from too frequent a use of the suspensive participle. I have brought forward some instances of all these, and others are marked with pencil in the pages of the work. I feel very great diffidence in expressing an opinion on a composition by so distinguished a scholar as Bal Shastree but my opinion having been required, I feel it my duty to say that to render this book worthy of the high character of Bal Shastree and of adoption by the Board of Education, it should undergo a very careful revision; the faults, I have pointed out, should be corrected and the style should be simplified. "

दादोबा पांडुरंगांच्या व्याकरणाच्या पुस्तकावरील टीकालेखांत कँडी लिहितोः—

" ... Under present circumstances, those who are endeavouring to direct and advance the progress of education and literature must feel that much responsibility rests upon them. If solecisms and barbarisms are now sanctioned and published by authority, they may obtain such a firm hold in the language as to vitiate it for ever. I trust that Mr. Dadoba Pandurang, for whom I feel unfeigned respect as one who has endeavoured to benefit his countrymen, will not be offended at the freedom with which I have expressed myself. My remarks are not directed against him personally, but against what I consider his solecisms. I invite him to unite his efforts with mine to banish barbarisms and to inculcate correct views of composition. "

तसेंच गंगाधरशास्त्री फडके यांच्या व्याकरणाच्या पुस्तकाच्या तिसऱ्या आवृत्तीच्या तपासणीनंतर कँडी म्हणतोः—

" I have carefully examined above 50 pages of the copy...and have also looked at it in other parts. I have found a good many errors in it; errors of construction, errors of omission and some barbarisms, so that I could not recommend its being printed in its present state. Still if there was no other grammar, there is no doubt that a Pandit of the acknowledged abilities of Gangadhar Shastree could so correct and improve it as to make it very desirable to print it for the use of the schools. "

एकोणिसाव्या शतकांतील मराठी भाषेचे सुरवातीचे व्याकरणकार म्हणून गणल्या गेलेल्या गंगाधरशास्त्री फडके, बाळशास्त्री जांभेकर व दादोबा पांडुरंग या तिन्ही विद्वानांच्या लेखनपद्धतीबद्दल कँडीचें मत अजमावण्याच्या दृष्टीनें वरील उतारे एकत्र दिले आहेत. त्या वेळच्या अन्य लेखकांपैकीं विश्वनाथ नारायण मंडलिक यांच्या ' संवयी आणि अभ्यास याविषयीं ग्रंथा ' वर अभिप्राय देतांना कँडी म्हणतोः—

" I wish very much that I could report favourably of the work as a Marathi composition and could say








that the author had conveyed his good sentiments in idiomatic language and had made a book likely to be attractive, and therefore beneficial to native youths. But as I have been called to give my opinion of the work, I must state it candidly. I deeply regret that I am under a necessity of reporting unfavourably of it as a Marathi book.

" The great faults of it are (1) that the idiom is English throughout; (2) that it abounds with high Sanskirt words which are unintelligible to the great majority of native readers; in which learned words are used where easy ones were available and (3) that the author has not adapted his illustrations and examples to native ideas, so that his work possesses but little attraction. "

पुस्तकांबरोबरच तत्कालीन नियतकालिकें बारकाईनें तपासण्याचें काम कँडी करीत असे. त्यांपैकीं कांहीं नियतकालिकें शाळांमधून पुरवणी-वाचनासाठीं वापरलीं जात. अशांपैकींच ' ज्ञानप्रसारक ' हें एक होतें. त्याचा एक अंक तपासून कँडी त्यावरील अभिप्रायांत लिहितो:—

" Government cannot consistently countenance and circulate periodicals which tend to bring the governing class of persons into contempt; nor can Government without fear of injuring public interest, circulate trashy productions, or papers, written in a vulgar, unidiomatical and ungrammatical style. If papers of this last description be circulated in schools, great injury may be the result. They may be considered as the Government standard of composition, and vitiation of the language may ensue. "

मेजर कँडीनें मराठी गद्याला सुसंघटित वळण लावण्याच्या दृष्टीनें कोणकोणत्या व्याकरणविषयक बारीकसारीक सूचना केल्या, त्या सर्व येथें देणें अशक्य आहे. कँडीच्या बाबतींत कांहीं लोकांना असेंहि वाटण्याचा संभव आहे कीं तो हें सर्व काम त्याचे पंडित परशुरामतात्या गोडबोले यांच्याकडून करवून घेत असे. अर्थात् एवढें निश्चित आहे कीं तात्यांची त्याला फार मदत होत असे. पण तो पूर्णपणें त्यांच्यावरच विसंबून नसे. खुद्द तात्यांच्या ' मृच्छकटिक ' या भाषांतरित पुस्तकांवरील टीकालेखांतील थोडासा भाग पहा :

"The word साम्यता is used to signify equality. The word is grammatically wrong. The proper word is समता or साम्य. Poetical liberty, I think, cannot justify a gross grammatical error. Again the word तुल्यता may be substituted for the wrong word with every advantage. ."

या एकाच उदाहरणावरून आपण कल्पना करूं शकतों कीं प्रत्येक शब्द कँडी किती मोजूनमापून वापरीत असे. वाक्यरचना व प्रयोग यांच्या बाबतींत तो किती कटाक्षानें पाहात असे तें खालील एकाच उदाहरणानें स्पष्ट होईल. बाबा गोखले यांच्या ' राजा मदन ' या कादंबरीवरील तपासणींत कडी लिहितो :

" The author is not consistent in his grammatical constructions, as will by seen by the few following examples:–He says, ही पोरगी असती तर हिला जियापलीकडे ठेवली असती. Here though the कर्म is inflected, the verb is in the feminine gender. But further down in the same page, he says, त्या दोघींनाहि संकेताप्रमाणें कोंडून ठेविलें. Here the कर्म is inflected and the verb is in the neuter gender. If the first sen-








tence be correct, in the second the verb should be ठेविल्या. If the second be correct, the verb in the first should be ठेविलें. There can be no reason why different constructions should be used in the two cases. Again we have, ह्या ठिकाणीं नेऊन रूपवतीस ठेविलें. In both these instances, the verb is in the neuter form, the कर्म being inflected. But if these be right ( I consider them to be quite right ) the sentence first quoted is wrong. "

प्रमाणाबाहेर इंग्रजी अवतरणें देण्याचें कारण इतकेंच कीं मेजर कँडीच्या प्रयत्नांची कल्पना वाचकांस यावी. ' करतो ' इत्यादि क्रियापदांत इडागम आणून ' करितो', ' मारितो ' अशीं रूपें वापरणें , ' सोडलेंस', 'केलेंस', 'सोडलेंत', 'केलेंत' इत्यादि क्रियापदांत कोंकणी बोली-प्रमाणें येणारा स अगर त काढून ' सोडिलें ,' ' केलें ' अशी स अगर त विरहित रूपें वापरणें, 'सोडित्ये,' ' मारित्ये ' इत्यादि क्रियापदांतील यकार काढून टाकणें, 'चांगल्यें', 'मोठ्ये' इत्यादि विशेषणांतील येकार काढून 'चांगल्या', 'मोठ्या' अशीं रूपें वापरणें, 'त्याणें', 'त्यांणीं', 'ज्यांणीं' इत्यादि सर्वनामांच्या रूपांतील णें अगर णीं या तृतीयेच्या विभक्तिप्रत्ययांबद्दल नें अगर नीं हे प्रत्यय लावणें, ' तिला राणी केली', ' त्या पोरानें ह्या मुलीस मारली ' इत्यादि वाक्यांची रचना कोंकणी प्रघातानुसार कर्मणि प्रयोगांत न करतां, ' तिला राणी केलें ', ' त्या पोरानें ह्या मुलीस मारिलें ' अशी भावे प्रयोगांत करण इत्यादि बदल त्यानें घडवून आणिले व ते मुख्यतः शालेय पुस्तकांच्या द्वारा मुलांच्या अंगवळणीं पाडण्याचा प्रयत्न केला. या बदलांपैकीं बरेचसे आज रूढ झाले आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं.

कँडीनें स्वतः जीं शालेय पुस्तकें रचलीं त्यांत मराठी क्रमिक पुस्तकांचा उल्लेख प्रामुख्यानें करावा लागेल. इ. स. १८५७ ते १८६१ पर्यंत हीं रचलीं गेलीं. या पुस्तकांच्या रचनेमागें त्याचे किती श्रम होते तें या ठिकाणीं सांगणें स्थलाभावीं कठीण आहे. या पुस्तकांचें संपादन करतांना त्यानें अवलंबिलेलें धोरण त्याच्याच शब्दांत सांगावयाचें झालें तर तें असें होतें:—

" I admit no prose pieces into the Marathi Series without revision by myself. And my revision is not a cursory reading but a careful examination of the piece with respect to matter, and style, and a comparison of the translation with the original, if the piece be a translation. My corrections in some of the pieces revised by me are numerous. "

## ख्रिस्ती धर्मावरील कँडीचीं पुस्तकें

मराठी क्रमिक पुस्तकांखेरीज कँडीनें वाचनपाठ-माला, विरामचिन्हांची परिभाषा, नीतिज्ञानाची परिभाषा, भूगोलाचें वर्णन भाग १ व २, हिंदुस्थानचें वर्णन इत्यादि शालोपयोगी पुस्तकें रचलीं. मोल्स्वर्थच्या मराठी-इंग्रजी कोशरचनेमध्यें कँडीनें केलेलें साहाय्य सर्वश्रुत आहेच. तसेंच त्यानें इंग्रजी-मराठी कोशहि तयार केला. याशिवाय ' हिंदुस्थानच्या अपराध्यांस शिक्षा करण्याविषयीं कायदा ' व ' दिवाणी काम चालविण्याच्या रीतीविषयीं कायदा ' हीं दोन कायदेविषयक पुस्तकें भाषांतरित केलीं. ख्रिस्ती धर्माकडे त्याचा प्रथमपासूनच ओढा असल्यामुळें त्यानें ख्रिस्तीधर्मप्रसारार्थ कांहीं पुस्तकें लिहिलीं होतीं. ' पवित्र शास्त्राचें मराठी भाषांतर करण्याकरितां त्यांनीं व मि. मोल्स्वर्थ यांनीं फार चांगले शब्द निवडून दिले, आणि भाषांतराच्या कामींहि योग्य अभिप्राय वगैरे देऊन मदत केली. ' त्याचप्रमाणें ' देवाच्या दहा आज्ञा ', ' खरा मार्ग ', ' खऱ्या धर्माचीं चिन्हें ', ' भाव कोणावर ठेवावा ', ' पश्चात्तापाची गोष्ट ', ' येशू ख्रिस्तानें जी प्रार्थना आपल्या शिष्यांस सांगितली तिजवर टीका ', ' येशु ख्रिस्ताचा धर्म शिकविणाऱ्यांची गोष्ट ' इत्यादि पुस्तकें त्यानें रचलीं. ख्रिस्ती धर्माच्या प्रसारासाठीं इ. स. १८२७ मध्यें स्थापन झालेल्या 'The Bombay Auxiliary Religious Society ' ला सुरवातीपासून मदत करणाऱ्यांपैकीं तो एक होता.








सुमारें पन्नास वर्षे मराठी भाषेची अविरत सेवा केल्यानंतर, दृष्टिमांद्यामुळें ता. २१ ऑगस्ट, इ. स. १८७६ रोजीं कँडीनें आपल्या नोकरीचा राजीनामा सरकारला सादर केला व सरकारनें मोठ्या नाइलाजानें ता. ३ नोव्हेंबर, इ. स. १८७६ रोजीं त्याचा स्वीकार केला. दुर्दैवानें थोड्याच दिवसांनंतर ता. २६ फेब्रुवारी, इ. स. १८७७ रोजीं मेजर कँडी खिस्तवासी झाला व महाबळेश्वरीं मालकमपेठ येथें त्याचें दफन करण्यांत आलें.

## '... मेजर कँडीसाहेबांनीं शिकविलें ' !

मेजर टॉमस् कँडी याचें जीवन व त्यानें मराठी भाषेबाबत केलेलें कार्य यांची केवळ रूपरेषा येथें दिली आहे. अर्वाचीन मराठी गद्याचा अभ्यास करतांना मेजर कँडीला कोणीहि विसरूं शकणार नाहीं. अर्थात् अर्वाचीन मराठी गद्याची घडण घडविण्याच्या कामीं त्याला तत्कालीन विद्वानांशीं दोन हात करावे लागले होते. या वादविवादाचा इतिहास मराठी भाषेच्या अभ्यासकांना फारच उद्बोधक होईल. परंतु स्थलाभावीं तो येथें देणें अशक्य आहे. कँडीच्या विरोधकांत 'प्रभाकर'कर्ते भाऊ महाजन व 'विस्तार'कर्ते रामचंद्र भिकाजी गुंजीकर हे प्रमुख होत. केवळ सरकारी मदतीच्या अपेक्षेनें बहुतेक तत्कालीन लेखक कँडीच्या म्हणण्याला मान तुकवून त्याच्या सूचनेप्रमाणें आपल्या लेखनपद्धतींत बदल करीत असत. या बाबतींत पुष्कळसें बालोपयोगी वाङ्मय निर्माण करणारे 'बालबोध'कार विनायक कोंडदेव ओक लिहितात :

" माझ्या लिहिण्याच्या पद्धतीविषयीं कोणी कांहीं म्हणोत. परंतु मी प्रांजलपणें आणि मोठ्या कृतज्ञभावानें कबूल करितों की, मला मराठी लिहिण्यास मेजर कँडीसाहेबांनीं शिकविलें. वास्तविक पाहिलें असतां, त्यांचें प्रत्यक्ष दर्शन मला कधींच झालें नाहीं. परंतु त्यांचे जे अभिप्रायलेख मला पाहण्यास शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांनीं मजकडे पाठविले, त्यांवरून पुष्कळ चांगल्या चांगल्या सूचना मला मिळाल्या, आणि माझ्या चुका मला कळल्या ... ... मी एवढें खचित सांगतों कीं, चांगल्या गुरूनें आपल्या आवडत्या विद्यार्थ्यास जसें आस्थेनें शिकवावें – त्याचा हात धरून त्यास सुमार्गास लावावें – त्याप्रमाणें मेजर क्यांडीसाहेबांनीं मला मराठी लिहिण्याच्या मार्गास लाविलें. "

## माझ्या मनाचें पाडस— !

माझ्या मनाचें पाडस
चुकलें हो रानोमाळ
दूर राहिलें स्थानक
दूर राहिला तो माळ

कधिं काळची ती कथा
सरे नुरे पडे पार
आज उरला केवळ
त्याचा कांहीं बडिवार !

त्याच स्वप्नसुखांतलीं
तरळतीं प्रतिबिंबें
त्यांच्या साकारतेसाठीं
मन एथें तेथें हिंडे

गुंफा भयाण ही दरी
उठे नाद गुर्गुरीचा
आणि अंतरांत जागे
ध्यास दूरच्या धामाचा

दूर राहिलें तें धाम
दूर राहिला जिव्हाळा
येथल्या या वास्तवांत
जागा झाला कळवळा

सारे विसरून आतां
सर्वस्वाचा मोहि उरे
जागतील आणि भाव
मीच माझा, माझें सारें !

— गणेश कुडे







श्री. मा. प. मंगुडकर

# मानवी इतिहासांत विचारांचें स्थान

.ानवी इतिहास म्हणजे महापुरुषांच्या पराक्रमाची जळती ज्योत आहे, केवळ सगळया थोर पुरुषांचें संगतवार लिहिलेलें एक चरित्र आहे, असा समज पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो. थोर लोकांच्या हातून जर विक्रम घडला नसता तर जगाचा इतिहासच लिहिला गेला नसता. इतिहासांतील राजे-महाराजे अगर सेनापती दुर्दैवानें जर बालवयांतच वारले असते तर बिचाऱ्या इतिहासकारांवर मोठा अनवस्थाप्रसंग गुदरला असता ! कारण त्यांना जगाच्या इतिहासाचें एक पान देखील कधीं उलगडतां आलें नसतें. व्यक्ति म्हणजेच इतिहास होय असें त्यांचें साधें समीकरण असतें. या व्यक्तिनिष्ठ इतिहासानें आसपासच्या भौतिक शक्तींकडे कानाडोळा केला इतकेंच नव्हे तर अक्षम्य दुर्लक्ष केलें आणि म्हणूनच १९ व्या शतकामध्यें भौतिकवाद्यांचा असा एक वर्ग पुढें आला कीं त्यांनीं याच्या अगदीं उलट बाजू घेतली. व्यक्ती म्हणजे सामाजिक आणि आर्थिक शक्तीच्या हातांतील खेळणीं आहेत, त्यांच्याकडे कर्तबगारीचा अत्यंत अल्पसा वांटा जातो; कारण भौतिक वा आर्थिक शक्ति हीच इतिहासाची खरी कारक शक्ति असते, हा विचार पुढें येऊं लागला. व्यक्तिवादी विचाराची प्रतिक्रिया म्हणूनच हा भौतिकवादी वा मार्क्सवादी विचार पुढें आला. या दोन्ही वर्गांनीं इतिहासाचीं आपलीं स्वतंत्र तत्त्वज्ञानें पुढें मांडलीं.

## इतिहासाच्या प्राचीन उपपत्ती

या दोन वर्गांप्रमाणें जगांतील सर्व धर्मांनीं इतिहासाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला असून त्यांनीं आपापली उपपत्ति पुढें मांडण्याचा प्रयत्न केला आहे. हिंदुधर्मामध्यें प्राचीन ऋषिवर्यांनीं इतिहास-शास्त्राची चर्चा केली आहे. अवतारवाद अगर युगवाद हीं हिंदुधर्मांतील इतिहासाची पहिली उपपत्ति होय. ही उपपत्ति अर्थातच दैवी उपपत्ति म्हणून प्रसिद्ध आहे. समाज जेव्हां अवनतीला जातो, तेव्हां ईश्वर जन्म घेतो आणि साऱ्या मानव-संघाचा उत्कर्ष करतो. ' यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । ', ' धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।' म्हणून हा विचार सर्वश्रुत आहे. अवनतीला गेलेल्या समाजाला ईश्वराच्या मदतीची करुणा भाकावी लागते, कारण त्या अवस्थेमध्यें आपला विकास करून घेण्याचें सामर्थ्य त्या मानवामध्यें नसतें. हा विचार भारतांत आणि पुराणांत सांगितलेला आहे. याशिवाय चार युगांच्या चक्रनेमिक्रमाची दुसरी एक दैवी उपपत्ति हिंदुधर्मांत मानलेली आहे. काल-प्रवाहामुळेंच समाज वैभवाला अगर विनाशाला जातो. कलियुगांत मानवसमाज रसातळाला जातो व कृत-युगांत तो उत्कर्षाप्रत पोहोंचतो. मानव हा क्रम चुकविण्यास दुबळा आहे. कारण नियति हीच इतिहासाची खरी प्रभावी प्रेरक शक्ति असते. या दोन्ही दैवी उपपत्तींचा अर्थ इतकाच कीं मानवाचा इतिहास अवतार, नियति अगर दैवी शक्ति यांच्या स्वाधीन आहे. मानव आपल्या सामर्थ्यानें नवा इतिहास घडविण्यास असमर्थ आहे कारण दैवी शक्ति त्याहून फार प्रभावी असते.

महाभारतांत याशिवाय दोन तऱ्हांनीं इतिहासाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला असून त्या उपपत्ती मानवी अगर लौकिक म्हणून ओळखल्या जातात. त्यांपैकीं पहिली उपपत्ति अशी कीं समाजाची प्रगति ही मुख्यतः राजावर अवलंबून असते. ' राजा कालस्य कारणम् ' असें याबाबत म्हटलें आहे. या तत्त्वाप्रमाणें राजा हाच समाजाचा आणि पर्यायानें इतिहासाचा नियंता असतो. जशी राजसंस्था तशीच समाजव्यवस्था व अर्थव्यवस्था ! समाजांतील वैभवशाली युग अगर विनाशाचा काल हा मुख्यत्वें राजामुळेंच येत असतो.

महाभारतांत याशिवाय दुसरी उपपत्ति सांगितली असून ती अधिक बुद्धिनिष्ठ आणि भौतिकवादी आहे. लोकप्रवृत्ति हीच इतिहासाची खरी कारक शक्ति असून तिच्या प्रमाणेंच इतिहास नवनवीन वळणें घेत असतो. राजाप्रमाणें समाजसंस्था नसतात तर उलट समाजव्यवस्थेप्रमाणें राजा असतो. जनता हेंच राजाचें खरें सिंहासन असून जनशक्ति हीच इतिहासाची खरी कारक शक्ति असते. भागवतामध्यें ही उपपत्ति सिद्ध करणारी वेन राजाची कथा दिलेली आहे. त्यांत लोकांच्या पुढाऱ्यानें म्हटलें आहे, ' कोणी राजा नसला म्हणजे राष्ट्राला भय निर्माण होतें. म्हणून या वेनाला आम्ही तो अयोग्य असतांना देखील राजा बनविलें.' यांतील 'राजा बनविलें' हा शब्दप्रयोग अत्यंत महत्त्वाचा असून त्यामुळें लोकांची सत्ता किती प्रबल

होती हें व्यक्त होतें. परंतु पुढें हा वेनराजा अनीतीनें वागूं लागला, म्हणून जनतेनें त्याला दगडांनीं ठेचून ठार मारलें व त्याच्या जागीं त्याच्या मांडीच्या घर्षणापासून उत्पन्न झालेल्या मुलाला बसविलें ( भागवत. ४-१३-१८ ). या गोष्टीवरून, जनता राजा निर्माण करूं शकते व त्याला ठार करूं शकते हें स्वच्छ होतें. लोकप्रवृत्तीला महत्त्व देणाऱ्या महाभारतांतील या मानवी उपपत्तीचा उल्लेख तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं आपल्या ' हिंदु-धर्माची समीक्षा ' या ग्रंथामध्यें केलेला आहे. " दैवी उपपत्तीच्या ऐवजीं इतिहासाची लौकिक उपपत्ति सुचण्याइतकी बौद्धिक प्रगति भारतीय तत्त्ववेत्त्यांनीं इतक्या प्राचीन काळीं केली होती" याबद्दल मोठें समाधान देखील त्यांनीं व्यक्त केलें आहे ( पान नं. १७३ ). खरोखर तीन हजार वर्षांपूर्वी भारतीय पंडितांनीं इतिहासाचें इतकें निरोगी भौतिक तत्त्वज्ञान पुढें मांडलें. परंतु दुर्दैवानें या विचाराचा प्रवाह मध्येंच लुप्त झाला आणि दैवी उपपत्तीनेंच आजवर आमच्या मनावर निरंकुश सत्ता गाजविली.

श्रुति-स्मृतींमध्यें आणखी एक उपपत्ति सांगितलेली असून तिचें साम्य महाभारतांतील पहिल्या उपपत्तीशीं जास्त आहे. या उपपत्तीप्रमाणें समाजाचा विकास आणि विनाश हा फक्त राजावर अवलंबून नसून तो राजा आणि पुरोहित यांच्यावर संयुक्त रीतीनें अवलंबून आहे. तेच दोघे समाजाला मारूं अगर तारूं शकतात. कारण इतिहासाच्या नौकेचें सुकाणूं हें मुख्यतः त्यांच्याच हातांत असून ते त्याला वाटेल ती दिशा देऊं शकतात.

हिंदु-धर्माप्रमाणें पारशी, ख्रिश्चन, मुसलमान इत्यादि धर्मांमध्यें इतिहासाची तत्त्वज्ञानें सांगण्याचा प्रयत्न केला आहे. जगांतील सर्वच धर्मांनीं ही उपपत्ति मांडतांना दैवी शक्तींचा आसरा घेतलेला आहे. सैतानी शक्तीमुळें मानवाचा ऱ्हास होतो आणि ईश्वरी शक्तीमुळें मानवाचा उत्कर्ष होतो हें तत्त्व सर्वांनींच सांगितलेलें आहे. अशा दैवी शक्तीच्या आश्रयामुळें मानवाचा स्वतःच्या सामर्थ्यावरील विश्वास उडून जातो. तो अज्ञात शक्तीची आराधना करूं लागतो व त्यामुळें तो अधिकाधिक दुबळा अगर दैववादी बनतो.

### विभूतिपूजेचा उद्‌भव

अठराव्या शतकांतील उपपत्तीप्रमाणें, थोरामोठ्यांचीं जीवन-चरित्र हाच मानवाचा खरा इतिहास होय. या विचाराचें नेतृत्व पुढें कार्लाइल या थोर विचारवंताकडे गेलें. त्यांनीं ' Heroes and Hero-worship " या आपल्या ग्रंथामध्यें या संबंधीं आपले विचार व्यक्त केलेले आहेत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें महंमद पैगंबरासारखे द्रष्टे, शेली – बायरन् सारखे कवी, शंकराचार्य – गौतमबुद्धांसारखे विचारवंत, जॉनसन् – रूसो सारखे पंडित आणि नेपोलियन – क्रॉमवेलसारखे खंदे सेनापती अगर राज्यकर्ते यांच्याच जीवनामुळें मनुष्याचा इतिहास घडलेला आहे. त्यांनीं आपला सिद्धान्त फार ठाशीवपणें मांडलेला आहे. कार्लाइल यांच्याच शब्दांत हा विचार सांगावयाचा झाल्यास असें म्हणतां येईल कीं, " The history of the world is but the biography of great men ". या विचारामुळें व्यक्तिनिष्ठ शिगेला पोंहोचली आणि विभूतिपूजा समाजामध्यें फार बोकाळली. महापुरुषांच्या चरणीं इतिहासाच्या साऱ्या प्रेरक शक्ती लोळण घेत असतात, हा या उपपत्तींतील मध्यवर्ती विचार होय.

### थोर पुरुष हीं अर्थव्यवस्थेचीं अपत्यें

तथापि १९ व्या शतकांतील मार्क्सवाद्यांना हा विचार वरपांगी, उथळ आणि एकांगी वाटला. कारण व्यक्तिनिष्ठ ऐतिहासिक तत्त्वज्ञानानें आर्थिक वा सामाजिक शक्तींना अगदींच गौण स्थान दिलें. उलट त्यांच्या मताप्रमाणें समाजांतील उत्पादनाच्या साधनाप्रमाणें सर्व परिस्थिति तयार होत असते. अर्थशक्ति हीच इतिहासाची खरी कारक शक्ति असते. तीच महापुरुषांना जन्म देते. तिच्या कुशींतून क्रांत्यांचा जन्म होतो. व तिच्याप्रमाणेंच समाजांतील सर्व उत्पात घडत असतात. एडवर्ड मॅक्चेसने सेट् या मोठ्या पंडितानें 'Masters of Political Thought' Vol. I या पुस्तकाच्या प्रस्तावनेमध्यें त्याचें फार चांगलें वर्णन केलें आहे. ते म्हणतात : " A change in the balance of economic power is the ultimate cause upon which depend all the other changes of human history–of political history, of the history of thought, of religion and the rest ". या अर्थप्रधान तत्त्वाचा प्रसार होत होत










त्यानें अखेरीस पुष्कळ इतिहासशास्त्रज्ञांचीं मनें भारून टाकलीं. एका इतिहासशास्त्रज्ञानें म्हटलें आहे कीं, "आतां-पर्यंत फक्त महापुरुषांच्या कृतींनाच अवास्तव महत्त्व दिलें आणि आर्थिक वा सामाजिक संस्थांकडे दुर्लक्ष केलें. खरें म्हणजे या संस्थांच्या शक्तीमुळेंच इतिहासाची घडण होत असते." त्याच इतिहासशास्त्रज्ञानें उपमेच्या आधारानें आपली कल्पना स्पष्ट केली आहे. "आर्थिक वा सामाजिक शक्ति म्हणजे समुद्रांतील प्रवाह असून ऐतिहासिक घटना त्यापासून निर्माण होणाऱ्या लाटांप्रमाणें असतात." लॅम्प्रेक (Lamprecht) या तत्त्वज्ञानें देखील याच सुरांत आपला सूर मिसळलेला आहे. ते म्हणतात: "आपण ऐतिहासिक घटनांचे कर्ते होऊंच शकत नाहीं. त्या घडण्यास जेव्हां परिपक्व होतात, तेव्हांच त्या घडत असतात. त्याला अनुसरून आपण आपलें धोरण आंखावयाचें असतें इतकेंच! वृक्षावरचें एखादें फळ आपण दिव्याच्या उष्णतेनें पिकवूं शकत नाहीं. तसा प्रयत्न केला तर आपण फसूं व फळ मात्र नासवून टाकूं. त्याचप्रमाणें कृत्रिम रीतीनें ऐतिहासिक घटना घडविण्याचा आपला खटाटोप व्यर्थ होय." या विचारवंतांनीं भौतिक परिस्थितीला सर्व महत्त्व दिलें. त्यांच्या उपपत्तीप्रमाणें भौतिक शक्ति हीच इतिहासाची कारक शक्ति आहे. आणि भौतिकशक्तीमध्यें अर्थशक्ति हीच सर्वश्रेष्ठ शक्ति आहे. म्हणून सर्व थोर पुरुष हे त्या काळच्या आर्थिकव्यवस्थेचीं अपत्यें असतात. ते त्या शक्तीचे प्रतिनिधी असतात. समाजामध्यें दोन शक्तींमध्यें सतत संघर्ष चालूं असतो. समाजांतील या दोन शक्ती म्हणजेच दलितवर्ग – विरुद्ध – त्यांची पिळवणूक करणारा सत्ताधारी वर्ग. लेनिनच्याच शब्दांत सांगायचें झाल्यास, 'समाजांत तुम्हाला इतरांसाठीं राबलें तरी पाहिजे किंवा इतरांना तुम्ही राबवलें तरी पाहिजे. तुम्ही दुसऱ्याचे गुलाम तरी झाला पाहिजे किंवा इतरांना तरी तुम्ही केलें पाहिजे. तुमची पिळवणूक तरी झाली पाहिजे अगर तुम्ही ती इतरांची तरी केली पाहिजे'. समाजव्यवस्था अशा तऱ्हेची असल्या-मुळें आर्थिक शक्ति हीच इतिहासाची खरी कारक शक्ति असते. अशा वेळीं मोठे पुरुष हे कुठल्यातरी आघाडीवरचे सेनानी असतात. ते सत्ताधारी वर्गासाठीं तरी आपले प्राण पाखडतात अगर दलितासाठीं तरी धारातीर्थीं मरण पतकरतात. शिवाजी सरंजामशाहीविरुद्ध लढला. फ्रेंच क्रांति म्हणजे वरिष्ठांच्या आर्थिक सत्त-खालीं भरडल्या गेलेल्या दलितांचा बंडखोर आवाज होता. इंग्लंडमधील रक्तशून्य राज्यक्रांति म्हणजे व्यापारी वर्गाच्या उदयाचा उषःकाल होय. अशा आर्थिक भाषेंत ते सार्‍या घटना बसवितात आणि थोर क्रांतिकारकांना त्यांच्या हातांतील साधनें मानतात. लेनिननें म्हटल्याप्रमाणें 'Great men are the nurses of revolution' हा सिद्धान्त मान्य केला म्हणजे व्यक्तीच्या कर्तृत्वशक्तीला ओघानेंच गौणस्थान प्राप्त होतें. कारण, त्यांच्या मताप्रमाणें हे थोर पुरुष इतिहास घडवीत नसतात तर इतिहासच त्यांना घडवीत असतो. म्हणून इतिहासांतील सारे थोर पुरुष जन्माला आले नसते तरी इतिहासावर त्याचा विशेष परिणाम झाला नसता. कारण, इतिहासाच्या उदरांतून दुसरे पुरुष जन्माला आले असते. क्रांती-साठीं समाजांत सर्व वातावरण तयार झालेलें असतें. अशा वेळीं दहा पुरुष त्या क्रांतीचें दाईचें काम करण्यास सिद्ध असतात. परंतु रूसो अगर व्हाल्टेर-सारखे एक दोन विचारवंत पुढें सरसावून हें काम उरकून टाकतात. तेव्हां बाकीचे आठ पुरुष आपली नजर तेथून काढतात आणि आपल्या कर्तृत्वशक्तीला इतर दिशेनें वाट मोकळी करून देतात. परंतु रूसो अगर व्हाल्टेरनें हें कार्य केलें नसतें तर बाकीच्या आठजणा-पैकीं कांहींजण पुढें आले असते व त्यांनीं ही कामगिरी पार पडली असती. थोडक्यांत म्हणजे इतिहास घडविण्यामध्यें महापुरुषांचा वांटा फारसा नसतो. ते दुसऱ्याच एका शक्तीच्या हातांतील साधनें असतात. आणि ही शक्ति म्हणजे समाजांतील उत्पादनाच्या साधनाप्रमाणें तयार होणारी आर्थिक शक्ति होय. त्यामध्यें व्यक्तीच्या कर्तृत्वाला फारसें स्थान नसतें.

## ज्ञानलालसा आणि स्वातंत्र्यप्रेरणा

व्यक्तिनिष्ठ इतिहासाचें एकांगी तत्त्वज्ञान खोडून काढण्यासाठीं पुढें सरसावलेल्या वरील अर्थप्रधान तत्त्व-ज्ञानांतील भौतिक बैठक कुणाहि बुद्धिवाद्याला मान्य होण्यासारखीच आहे. परंतु तिच्यांतील ऐकान्तिकता विचारशील मनाला जाणवल्यावांचून रहात नाहीं. महापुरुष हे कुठल्यातरी वर्गाचे प्रतिनिधी असतात. आणि हेंच त्यांच्या कामगिरीचें खरेंखुरें मूल्यमापन










होय. हेंच साऱ्या मार्क्सवाद्यांचें म्हणणें. परंतु या म्हणण्यामध्यें आर्थिक शक्तींना दिलेल्या अवास्तव महत्त्वामुळें हें तत्त्वज्ञान डागळल्यावांचून रहात नाहीं. थोर पुरुषांच्या कृतीमागें अर्थहेतूचा गुप्त पोलीस लावणें योग्य होणार नाहीं. अर्थप्रेरणा ही मानवाच्या मनांतील एक जबरदस्त प्रेरणा आहे यांत शंकाच नाहीं. परंतु त्याशिवाय मानवाच्या मनामध्यें इतरहि कांहीं प्रबल प्रेरणा असूं शकतात. ते केवळ आर्थिक शक्तीचे प्रतिनिधी आहेत असें मानण्यामध्यें कधीं कधीं त्यांच्यावर फार मोठा अन्याय केला जातो. " मानवी इतिहास हा वर्गयुद्धाचा इतिहास आहे " असें गृहीत धरल्यामुळें त्यांत ही आत्यंतिकता शिरलेली आहे. मानवाचा इतिहास हा जसा वर्गयुद्धाचा इतिहास आहे त्याचप्रमाणें तो मानव आणि निसर्ग यांच्यामधील झगड्याचाहि इतिहास आहे. मनुष्य गेलीं अनेक वर्षें एखाद्या मल्लाप्रमाणें दंडमांड्या थोपटून निसर्गाशीं सामना देण्यासाठीं आखाड्यांत उतरलेला आहे. मानवाच्या इतिहासामध्यें वर्गयुद्धाप्रमाणें निसर्गयुद्धाला देखील मानाचें स्थान आहे. शिवनारायण रे या पंडितानें 'In Man's own Image' या आपल्या पुस्तकामध्यें म्हटलें आहे: " From the earliest dawn of human civilization to our present time man has been constantly endeavouring ... to invest the neutral processes of nature with a direction to meet human needs " ( page 85 ). शिवाय मार्क्सवाद्यांच्या म्हणण्याप्रमाणें माणसें नेहमींच आर्थिक हेतूनें कार्यप्रवृत्त झालेलीं नसतात तर त्याहूनहि विशाल मानवतावादी भावना त्यांच्या हृदयामध्यें नांदत असते. गौतमबुद्धानें आपलें श्रेष्ठ तत्त्वज्ञान केवळ दलितांसाठींच मांडलें असें म्हणणें त्याच्या कार्याचा व हेतूचा विपर्यास होय. येशू ख्रिस्तानें आपला शांततावादी संदेश मनुष्यप्राण्याला दिला तो फक्त श्रीमंतांच्याच विरुद्ध होता असें कसें म्हणतां येईल ? भूतदयावादी अगर मानवतावादी प्रेरणा देखील त्यांच्या कार्यामागें असूं शकते. स्वातंत्र्याची लालसा आणि ज्ञानाची तृष्णा या दोन मूलभूत प्रवृत्ती देखील इतिहास घडविण्यास मदत करीत असतात. शिवनारायण रे यांनीं वरील पुस्तकाच्याच प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें, "The key to human progress is to be found in the quest for freedom and search of truth which are the basic urges of human nature " ( Page 7 ). शास्त्रज्ञांनीं रात्रंदिवस प्रयोगशाळेंत खपून संशोधन केलें, कवींनीं काव्यें केलीं, कलावंतांनीं आपल्या कलाकृतींनीं मानवाला विभूषित केलें, तें कोणत्या हेतूनें ? न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणामुळें कुठल्या वर्गाचें हित झालें ? कालिदासाच्या कलाकृती म्हणजे त्याच्या प्रतिभेचा मनोहर खेळ होता. त्या ठिकाणीं कोणती आर्थिक प्रेरणा शोधून काढायची ? अशा तऱ्हेनें कधीं कधीं आर्थिक हेतूंना उल्लंघून पलीकडे निघून जाणारी थोर मानवतावादी प्रेरणा श्रेष्ठ पुरुषांच्या अंतःकरणामध्यें वसत असते. ज्ञानाची हिरीरी आणि स्वातंत्र्याची लालसा हो देखील इतिहास आपापल्या परीनें घडवीत असतात. असें असतांना इतिहासाच्या सर्वच घटनांचें मूल्यमापन आर्थिक मोजपट्टीनें करणें कधीं तरी उचित होईल काय ?

## मानव आपल्या भवितव्याचा शिल्पकार

वरील विचाराप्रमाणेंच मार्क्सवाद्यांच्या दुसऱ्या एका विचारामध्यें अशीच गल्लत झालेली आहे. त्यांच्या समूहवादाच्या पोटीं हा दोष जन्माला आला आहे असें वाटतें. थोर पुरुष हे आर्थिक शक्तींच्या हातांतील साधनें आहेत. ते फक्त क्रांतीच्या दाई ( nurses of revolution ) असतात असें मानण्यामध्यें ते व्यक्तीच्या गुणांना संपूर्णपणें डावलून टाकतात. परिस्थितींतून व्यक्ती निर्माण होतात त्याचप्रमाणें व्यक्तीमुळेंहि परिस्थिति निर्माण होऊं शकते. क्रेकोनोव्ह हा थोर विचारवंत व्यक्तीचा इतिहासावर होणारा परिणाम मान्य करतो, परंतु तो फार मर्यादित अर्थानें. यूरोपमध्यें नवजीवनाची चळवळ झाली. ती चळवळ मायकेल अँन्जेलो, व्हिन्ची, रॅफेल या पुरुषांनीं समृद्ध केली. त्यांच्या जागीं दुसरे कलावंत असते तर त्यांना ती इतकी वैभवशाली करतां आली नसती. परंतु वरील विचारवंतांवांचून ती चळवळ अडून राहिली असती असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. कांहीं कमी प्रमाणामध्यें ती समृद्ध झाली असती इतकेंच. एवढाच त्या महाभागांचा इतिहासावर होणारा परिणाम ! म्हणजे व्यक्तीच्या कर्तृत्वाला इतिहासांत वाव आहे. परंतु ती कर्तबगारी








परिस्थितीच्या विशिष्ट चौकटीमध्यें मर्यादित झाली आहे. त्याच्या पलीकडे झेप घेण्याचें सामर्थ्य व्यक्तीच्या गुणांत नाहीं. प्लेखॅनॉव्ह् यांच्याच शब्दांत हा विचार मांडावयाचा असल्यास असें म्हणतां येईल कीं, " The character of an individual is a factor in social development only where, when and to the extent that social relations permit it to be such"— या त्यांच्या विचारामध्यें सत्य आहे परंतु तें अर्धसत्य आहे. कारण विचाराच्या सामर्थ्याला त्यांनीं गौणस्थान दिलेलें आहे. विचाराचें सामर्थ्य देखील फार प्रभावी असतें. तत्त्वज्ञानावर परिस्थितीचा परिणाम होतो; त्याचप्रमाणें तत्त्वज्ञानाचा देखील भविष्यकाळावर परिणाम होत असतो. बर्ट्रान्ड रसेल यांनीं ' The History of Western Philosophy ' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें " तत्त्वज्ञ हे परिस्थितीची अपत्यें असतात, त्याचप्रमाणें जनक देखील असतात. ते त्यांच्या काळच्या समाजसंस्था, राज्यसंस्था आणि आर्थिक व्यवस्था यांचीं अपत्यें असतात. परंतु ते पुढील भविष्यकाळाला मुरड देणारे शिल्पकारहि असतात" (पा. ५) दुसऱ्या एका पंडितानें म्हटल्याप्रमाणें "माणूस हा नेहमींच परिस्थितीचा किंकर नसतो, तो तिचा निर्माता देखील असतो." कारण विचारामध्यें कर्तुमकर्तुम् शक्ति सांठविलेली असते. या विचाराच्या जोरावर आजचा मानव विश्वाची नवरचना करण्याची भाषा बोलत आहे. त्या ध्येयाच्या ध्यासानें तो चेतलेला आहे. खुद्द मार्क्सला देखील विचाराचें हें श्रेष्ठत्व अभिप्रेत असलें पाहिजे. " आतांपर्यंतचे सारे तत्त्वज्ञ इतिहासाचा फक्त अर्थ लावण्याचा प्रयत्न करीत आले. मुख्य मुद्दा आहे तो हा कीं हें सारें जगच पालटून टाकलें पाहिजे." हें त्याचें ( Theses on Feuerbach मधील ) वरील वाक्य काय सुचवितें ? मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचें इतर तत्त्वज्ञानाहून वेगळेंपण हेंच आहे कीं तें मुख्यतः क्रियाशील आहे. माणसाच्या विचाराचें सामर्थ्य जर मान्य केलें नाहीं तर त्याची ही क्रियाशीलता पांगळी बनविण्यासारखेंच नाहीं काय ? 'मानव आपल्या भवितव्याचा शिल्पकार आहे' यावर मार्क्सचा अभंग विश्वास होता आणि म्हणूनच जगाची नवरचना करण्याच्या स्वप्नामध्यें तो दंग झाला होता. यामध्येंच त्यानें विचाराच्या श्रेष्ठतेला मान्यता दिलेली आहे. मार्क्सवादावरील एक थोर टीकाकार मानवेन्द्रनाथ रॉय यांनीं म्हटल्याप्रमाणें " मार्क्सला अभिप्रेत असलेलें हें बुद्धिसामर्थ्य विचारांत न घेतां केवळ आंधळेपणानें याच्या ऐतिहासिक नियतिवादानें सर्व घटनांचा जे अर्थ लावूं पाहतात, त्यांची फजिती झाल्यावांचून रहात नाहीं."

**बुद्धितत्त्व आणि कल्पनारम्यता यांचा संगम**

शिवाय जगांतल्या क्रांत्यांमध्यें भौतिक परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण ( Rationality ) असतें, त्याचप्रमाणें कल्पनारम्यता, स्वप्नाळु ध्येयवाद ( Romanticism ) असतो. ज्ञानां-( Reason )च्या साहाय्यानें क्रांतिकारक परिस्थिति काय आहे याचा अर्थ समजून येतो. परंतु प्रतिभेच्या जोरावर कुठल्यातरी उंच वातावरणांत जाऊन आपल्या दृष्टीसमोर अत्यंत आल्हाददायक नि मनोहर विश्व निर्माण करून जग कसें असायला हवें याचें दर्शन इतरांना घडवून देतां येतें. अशा कल्पनारम्यतेचा माणसाच्या सर्जनशक्तीवर अमर्याद विश्वास असतो. या दृष्टीनें क्रांतीमध्यें भौतिक विश्वाचें आकलन म्हणजे ज्ञानतत्व (Rationality) असतें, त्याचप्रमाणें कल्पनारम्यता अगर Romanticism असतो. या दोन्हींच्या संयोगांतून क्रांति जन्म घेत असते. हाच विचार शिवनारायण रे यांनीं मांडला आहे : " भौतिक ज्ञानाला कल्पनारम्यतेची झिलई दिली आणि कल्पनारम्यतेला भौतिक ज्ञानाची जोड दिली कीं जगांतल्या क्रांत्यांची पाऊलवाट तयार केली जाते". म्हणून इतिहासाचा अर्थ लावतांना विचारांच्या श्रेष्ठतेला स्थान न देणें म्हणजे आपलें इतिहासाचें तत्त्वज्ञान उथळ अन् एकांगी आहे हा दोष पदरांत घेणें आहे.

एकटी व्यक्तिनिष्ठ ऐतिहासिक उपपत्ति इतिहासाची शक्ति उकलून दाखविण्यास दुबळी आहे. त्याचप्रमाणें भौतिकवादी अर्थप्रधान उपपत्ति देखील हा अर्थ लावण्यास असमर्थ आहे. पहिला विचार हा योग ( thesis ) आणि दुसरा विचार हा जर प्रतियोग ( Anti - thesis ) आहे असें मानलें तर त्यांच्या संयोगा - ( synthesis ) मधून तयार होणारें नवें शास्त्रीय तत्त्वज्ञानच आपल्याला हा अर्थ सांगूं शकेल. त्यामुळेंच आपणास इतिहासाचें सम्यक्ज्ञान होऊं शकेल.








# महाविद्यालयांतील अध्यापक आणि समाज

[ पुणें विद्यापीठ-अध्यापक-संघातर्फे महाविद्यालयांतील अध्यापकांची परिषद् ( Conference of College Teachers in the Poona University Area ) गेल्या २२ व २३ जानेवारीला येथें भरली होती. या दोन दिवसांत ' परीक्षापद्धति ', ' शिक्षक व विद्यार्थी यांमधील संबंध ' आणि ' शिक्ष... व समाज ' या विषयांवर चर्चा झाली. या चर्चेकरितां परिषदेच्या चालकांनीं आधींपासून या विषयासंबं... निबंध मागविले होते. – त्या परिषदेंत ' महाविद्यालयांतील अध्यापक व समाज ' या विषयासंबंधीं झालेल्या चर्चेंत जे निबंध वाचले गेले त्यांपैकीं तीन निबंध पुढें दिले आहेत. एका अत्यंत महत्त्वाच्या विषयासंबंधीं ... निबंधांतून दिसणारें निरनिराळया दृष्टिकोनांचें दर्शन वाचकांस उद्बोधक वाटेल असा विश्वास वाटतो. प्रस्तुत नि... ' नवभारता ' करितां उपयोग करूं दिला याबद्दल पुणें विद्यापीठसंघाचे कार्यवाह व निबंधांचे लेखक यां... पूर्वक आभार. – का. सं. ].

## अध्यापकाचें समाजांतील स्थान

प्रा. स. व...

आजच्या चर्चेचा विषय ' अध्यापक आणि समाज ' अशा शब्दांत असला, तरी त्याचा अर्थ ' समाजामध्यें अध्यापकाचें स्थान ' असा मी समजतों. समाजांतील प्रत्येक माणसाप्रमाणेंच शिक्षक देखील समाजांतच रहातो, समाजांतच काम करतो, आणि समाजांतच राहून विचार करतो. समाजांतील घटनांचा, परिस्थितीचा, दडपणाचा इतरांप्रमाणें त्याच्यावरहि परिणाम होतच असतो. कदाचित् जीवनाच्या इतर क्षेत्रांतील कार्यकर्त्यांपेक्षां शिक्षकांना – निदान कांहीं शिक्षकांना तरी सामाजिक शक्तींची जाणीव अधिक तीव्र असण्याचा संभव आहे. शिक्षकाच्या कामाला जशी बौद्धिक बाजू आहे, तशी सामाजिक बाजूहि आहे. वर्गांत किंवा वर्गाबाहेर ज्या तरुण विद्यार्थ्यांशीं त्याचा संबंध येत असतो त्यांच्यावर शिक्षकाची छाप भावित-अभावितपणें पडत असते. शिक्षकाच्या कामाच्या सामाजिक बाजूचा विचार करीत असतांना आणखी एक गोष्ट लक्षांत येते. ती ही कीं, शिक्षकानें ज्ञानाचें रक्षण, प्रसार व संवर्धन करून समाजाच्या रक्षणाला व प्रगतीला हातभार लावला, अशीहि एक अपेक्षा असते. म्हणून शिक्षक व समाज हे पर...पासून अगदीं विलग आहेत असें मानणें हें वस्तुस्थितीदि...द व अनिष्ट होय.

१ मूळ इंग्रजींतून ...हिलेल्या निबंधाचा ...

### जुन्या कल्पनांचा पगडा

शैक्षणिक कार्याव्यतिरिक्त मग शिक्षकाचें समा... स्थान कोणतें ? – असाच प्रश्न आपणांस इतर व्यव...यांतील लोकांनाहि विचारतां येईल व तसा प्रश्न वि...रणें सर्वांच्याच दृष्टीनें बोधप्रद ठरेल. पण या प्रश्नाचा ... विचार आतांपर्यंत झाला आहे तो शिक्षकांपुरता, बराच ... एकांगी झाला आहे. याचें एक कारण हें असू... कीं, अध्यापनाच्या व्यवसायांत काम करणाऱ्यांची सं... बरीच मोठी आहे. पण यापेक्षांहि महत्त्वाचें का... म्हणजे आपल्या राष्ट्रीय इतिहासांतील परिस्थितीनें ... प्रश्नाला दिलेली कांहींशी विकृत कलाटणी हें ... स्वातंत्र्योत्तर कालांत त्या परिस्थितीमध्यें मूलभूत ... घडून आला असला तरी विचाराच्या जुन्या चाकोर... , प्रवृत्ति... तरुण मनांवर शिक्षकांच्या ' राज्यद्रोही ... छाप पडण्याची भीति, अशासारख्या जुन्या ... अजूनहि तग धरून आहेत. त्यांतूनहि खेदजनक ... अशी कीं, परिस्थितींतील ज्या प्रगति... बदलामुळें कालचे चळवळये आज राज्यकर्त्या... आसनावर जाऊन बसले आहेत, तोच प्रगति... बदल महाविद्यालयांतील व विद्यापीठांतील अध्या...च्या सामान्य ' नागरिक हक्कां 'वर नियंत्रण घाला...






कर्णीभूत झाला आहे. ही अनुदारतेची लाट पसरत पसरत थेट विद्यापीठापर्यंत जाऊन पोहोंचली आहे. विद्यापीठांतील अंतर्गत कारभारांतहि भाग घ्यायचा अध्यापकाला हक्क नसावा येथपर्यंत त्या अनुदारतेची मजल गेली आहे. याचीं उदाहरणें म्हणून – मध्यप्रदेश-सरकारनें आपल्या राज्यांतील सरकारी मदत घेणाऱ्या महाविद्यालयांना जें आदेशपत्रक पाठविलें आहे ( – ज्या पत्रकाचा तीव्र निषेध डॉ. र. पु. परांजप्यां-सारख्या अधिकारी व्यक्तीनें केला आहे – ) तें व आ...री महाविद्यालयांतील अध्यापकांनीं विद्यापीठांतील दिलेल्या...राळ्या मंडळांवरील जागांकरितां निवडणुकीस असतें. ...ं नये या आशयाचें मुंबईसरकारनें कांहीं प्रमाणें तर...ं काढलेलें पत्रक – यांचा उल्लेख केला तरी पुरें. असतो. ...हें नियंत्रण थोडें सैल करण्यांत आल्याचें Wester... या प्रश्नासंबंधीं कांहीं जबाबदार गोटांतून म्हटल्याप्रमा...का घेतली जात आहे याची वरील पत्रका-तात, त्याच...करतां येते.

...ळच्या घटना ...घडून येत असतांनाहि, अध्यापक म्हणून आपण ...या विषयासंबंधीं आपले विचार निश्चित करून ते स्पष्ट...पणें मांडलेले आहेत असें दिसून येत नाहीं. उलट, आ...पल्यापैकीं ज्यांना या प्रश्नाच्या महत्त्वाची उत्कटतेनें जाणीव होते व ज्यांनीं त्याबाबत सार्वजनिक चर्चा व्हावी असा प्रयत्न केला आहे त्यांच्यावर ' ह्यांना आपल्या मूळ व्यवसायाविषयींच आस्था नाहीं ' असा शिक्का मारण्यांत येतो ! अध्यापकां-मध्येंच याविषयींची अनास्था दिसून येते असें नव्हे. ज्यांना पूर्वग्रहरहित दृष्टीनें या विषयाचा विचार करतां येईल असे जे अध्यापकेतर विचारवंत त्यांचीहि याविषयीं अनास्था आहे. या दुहेरी अनास्थेचा परिणाम अध्यापकाच्या कार्यक्षमतेच्या दृष्टीनें विघातक ठरणार आहे. यापेक्षांहि संभाव्य अनिष्ट परिणाम म्हणजे ज्या लोकशाहींत अध्यापकाच्या व्यवसायाचें, कामाचें, त्याच्या सामाजिक दर्जाचें स्वरूप ठरविलें जाणार, त्या लोकशाहीपासूनच तो दूर लोटला जाण्याचा संभव आहे.

## अलिप्ततावादी अध्यापक

अध्यापकाचें आद्य कर्तव्य म्हणजे त्याचें अध्यापन-कार्य होय याविषयीं वादच नाहीं. त्याला जें संशोधन करणें शक्य असेल त्या संशोधनाचाहि त्या अध्यापन-कार्यांत समावेश होतोच. परंतु मुख्य प्रश्न असा आहे कीं, हें आपलें अध्यापनकार्य चांगल्या तऱ्हेनें करण्या-करितां देखील अध्यापकानें आपल्या भोंवतीच्या सामा-जिक जीवनांतील मुख्य प्रवाहापासून दूर, अलिप्त, तटस्थ रहाणें आवश्यक व इष्ट आहे काय ? या बाबतींत माझी तर अशी भावना आहे कीं, समाजविषयक शास्त्रें, साहित्य, तत्त्वज्ञान यांसारख्या विषयांत, अध्या-पकानें केवळ पुस्तकांतील सारांशाची निर्जीव पोपट-पंचीच करावयाची नसेल, उलटपक्षीं, जर विद्यार्थ्यां-समोर नवनवीन विचारांचें व प्रश्नांचें विश्वच उभें कर-णारी मार्मिकतेची व प्रतिभेची चुणूक त्याच्या अध्याप-नांत उमटावयाची असेल, तर त्याला आपल्या ' हस्ति-दंती किल्ल्या-( ivory tower )' मध्यें अलिप्तपणें राहून भागणार नाहीं. ' विद्यापीठांतील राज्यशास्त्राचें अध्यापन ' या विषयावर युनेस्कोला प्रो. रॉबसन यांनीं एक अहवाल ( १९५४ ) सादर केला आहे. त्यांत या प्रश्नाविषयीं त्यांनीं जे विचार प्रकट केले आहेत ते प्रस्तुत विषयाशीं संबद्ध म्हणून उल्लेखनीय आहेत. वास्तवतेशीं अध्यापकाचा अधिक जिव्हाळ्याचा संबंध यावा याविषयीं विवेचन करतांना प्रो. रॉबसन यांनीं म्हटलें आहे ( पा. ११६ ): " एखादा राज्यशास्त्रज्ञ जर आजूबाजूच्या प्रत्यक्ष वास्तव जगापासून संपूर्णपणें अलिप्त राहिला, तर त्यांत मोठा व स्पष्ट धोका हा आहे कीं त्याचें अध्यापन केवळ पुस्तकी, पढीक होऊन प्रत्यक्ष वस्तुस्थितीचा वेध तें घेऊं शकणार नाहीं. प्रश्नांच्या निकडीची जाणीव करून देणें, त्यांचा अर्थ किंवा आशय अचूकपणें हेरावयास त्यांना समर्थ करणें हे जे उत्तम अध्यापनाचे गुण ते अशा अलिप्ततावादी राज्यशास्त्रज्ञाच्या अध्यापनांत नसतात. उलट, प्रत्यक्ष व्यावहारिक जगापासून दूर राहिल्यामुळें त्याचें अध्यापन मिळमिळीत व निर्जीव होण्याची शक्यता आहे. संशोधनाच्या क्षेत्रांतहि ह्या आत्यंतिक अलिप्ततावादाचे विघातक परिणाम होतील. हल्लीं विद्यापीठांतून जें राज्यशास्त्रीय संशोधन म्हणून केलें जातें, त्यांतील बरेंचसें राजकीय जीवनांतील खऱ्या प्रत्यक्ष प्रश्नांना धरून नाहीं. पुष्कळ वेळां तर तें केवळ संशोधनाकरितां संशोधन म्हणूनच केलें जातें. संशो-धनाकरितां निवडलेल्या विषयांत कांहींच जीव नसतो आणि अशा विषयांवर केलेल्या संशोधनानें कोणत्याहि








महत्त्वाच्या समकालीन समस्येवर प्रकाश पडत नाहीं. अशा संशोधनामागें कांहीं प्रेरणा नसते, जिव्हाळा नसतो. त्या संशोधनाचे जे निष्कर्ष म्हणून मांडलेले असतात त्यांतूनहि कांहींच उपयुक्त निष्पन्न होण्यासारखें नसतें."

## समाजशास्त्रज्ञाकडे बघण्याची दृष्टि

वरील विवेचन राज्यशास्त्रासंबंधीं असलें तरी त्याची व्याप्ति त्या विषयाहून बरीच अधिक आहे असें वाटतें. त्यांत जो मुद्दा विशेष कटाक्षानें सांगितला आहे तो हा कीं, शिक्षक जो सामाजिक जीवनांत भाग घेतो तो त्याचें अध्यापनकार्य किंवा संशोधनकार्य करून शिल्लक राहिलेल्या शक्तीला वाट देण्याकरितांच होय असें मानण्याची नेहमींच आवश्यकता नाहीं. उलट, त्या सामाजिक कार्याचा त्याच्या अध्यापनकार्याशीं जिव्हाळ्याचा संबंध असूं शकतो. अध्यापकाचें अध्यापनकार्य व सामाजिक कार्य यांत कांहीं जिव्हाळ्याचा किंवा एकजीवपणाचा संबंध असूंच शकत नाहीं हा जो सर्वसामान्य समज आपल्या देशांत दिसून येतो त्याचें मूळ, माझ्या दृष्टीनें, येथील लोकांच्या विद्वान् पंडिताविषयींच्या परंपरागत कल्पनेंत आहे. खऱ्या नमुनेदार अध्यापकाचा आदर्श म्हणजे एकांतांत बसून प्राचीन हस्तलिखितांचें व पोथ्यांचें वाचन – अध्ययन – पारायण करणारा प्राच्यविद्यापंडित होय अशी परंपरागत कल्पना आहे. त्या कल्पनेचा पगडा जनमनावर आजहि प्रामुख्यानें दिसून येतो. त्यानंतरची अध्ययन-अध्यापनाला वाहिलेल्या पंडिताची कल्पना म्हणजे प्रयोगशाळेंत स्वतःला कोंडून घेऊन बसलेल्या सृष्टिशास्त्रज्ञाची होय. या दोन्ही कल्पनांत आपल्या प्रस्तुत विवेचनाच्या दृष्टीनें पहातां विशेष मूलगामी असा फरक नाहीं. पण त्यानंतर अलीकडेच विद्येच्या क्षेत्रांत पदार्पण केलेला जो समाजशास्त्रज्ञ, त्याला ( त्याच्या समाजशास्त्रीय संशोधनाचें स्वरूपच वेगळ्या प्रकारचें असतें म्हणून म्हणा किंवा पूर्वीच्या पंडितांच्या मिरासदारीमुळें म्हणा) आदर्श अध्यापकाच्या स्थानावर हक्क प्रस्थापित करणें कठीण जात आहे. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, समाजशास्त्रज्ञाच्या विषयाच्या कक्षेंत येणारें जें रीतसर कर्तव्य त्याकडे अध्यापनक्षेत्रांतले मानकरी तज्ज्ञ व अध्यापनक्षेत्राबाहेरील अनभिज्ञ लोक हे दोघेहि संशयानें बघत आहेत.

## समाजांतील प्रवृत्तींविषयीं अज्ञान

समाजांत समाजशास्त्रज्ञांचें स्थान काय असावें एवढ्यापुरताच हा विषय मर्यादित नाहीं. ज्यांच्या अभिरुची जुन्या परंपरागत ज्ञानामृतावर परिपुष्ट झाल्या आहेत त्या पंडितांच्या किंवा सृष्टिशास्त्रज्ञांच्या अध्यापन-संशोधन-कार्यालासुद्धां एक सामाजिक व पुं असतेच. मोठेमोठे जगत्प्रसिद्ध पदार्थविज्ञानशास्त्रशिक्षक अलीकडे जे राजकारणांत पडलेले दिसतात त्यासंबंधी आपल्या अज्ञ बांधवांच्या कृत्यांकडे व निर्णयांकडे तटस्थतेनें व स्थितप्रज्ञतेनें पहाणें त्यांनाहि इ...पर अशक्य झालें आहे असें स्पष्ट दिसून येतें.

ज्या विद्वानांचें अध्ययन-अध्यापन समाजापासून अलिप्त राहून दूर एकांतांत होण्यासारखें आहे, त्यांच्या बाबतींतहि हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं त्यांना लागणाऱ्या सोयी व साधनसामग्री विद्याक्षेत्राबाहेरील शक्तींच्या निर्णयावरच अवलंबून असतात. कित्येक वेळां तर या निर्णयांमागें एकंदर समाजाच्या दृष्टीनें खूप सखोल अर्थ भरलेला असतो. म्हणूनच आपल्या एकांतांतील उच्चासनावरून खालीं उतरून, परिस्थितीचें प्रमाणशीर मूल्यमापन घडवून आणावयास साहाय्य करणें, आणि आपणांस जें सत्कार्य वाटतें त्याच्या सिद्ध्यर्थ एक नागरिक म्हणून आपले हक्क उपयोगांत आणणें हें विद्वानांचें अवश्य कर्तव्य ठरतें. प्रत्येक प्रौढ नागरिक सार्वजनिक कारभारांत जितक्या प्रमाणांत समंजसपणें आस्था दाखवील, तितक्या प्रमाणांत लोकशाही यशस्वी होत जाईल असें नेहमीं सांगितलें जातें. असें सांगणारांत जर मोठा आवाज कोणाचा असेल तर तो विद्यापीठीय क्षेत्रांतील लोकांचा. तेच लोक जेव्हां आपले साधे नागरिकाचे हक्कहि अमलांत आणायला कचरतात तेव्हां त्याचें नवल वाटतें. हें खरें कीं, आपापल्या स्वभावभेदाप्रमाणें कांहीं व्यक्तींना सार्वजनिक कामाबद्दल इतरांपेक्षां विशेष गोडी असते. साहजिकच त्या व्यक्ती इतरांपेक्षां सार्वजनिक कार्यांत अधिक कर्तबगार ठरतात. म्हणूनच मतदान करणें आणि सार्वजनिक प्रश्नांची पूर्ण माहिती करून घेणें या किमान गोष्टी सोडल्यास त्यापलीकडे प्रत्येक व्यक्तीनें कोणतें व किती प्रमाणांत सार्वजनिक कार्य केलें पाहिजे याविषयीं नियम करणें अशक्यच आहे. परंतु शिक्षणव्यवसायांतील एखादा मनुष्य सार्वजनिक कार्यांत पडल्यास तो








कणूं काय पावित्र्यभंग करीत आहे असें मानण्याची पी प्रवृत्ति दिसून येते ती पाहून अचंबा वाटल्याशिवाय हात नाहीं. ज्या गुंतागुंतीचे संबंध असलेल्या समाजांत आपण रहातों व ज्याची आपण सेवा करावी असें मानलें जातें, त्या समाजाच्या विषयींचें गाढ अज्ञान सर प्रवृत्तीच्या बुडाशीं आहे.

महा कित्येक वेळां असा एक युक्तिवाद करण्यांत येतो (१ग, 'आपापल्या व्यवसायांत करावयाचें काम काय कमी पडलें आहे ? इतर सार्वजनिक उठाठेवीची काय गरज ?' पण हा युक्तिवाद पटण्यासारखा नाहीं. कारण, एक तर हा युक्तिवाद प्रत्येक व्यवसायाला – वकील, डॉक्टर, इंजिनियर इत्यादिकांना – लावावा लागेल. तसा तो लावल्यास त्यापासून तर्कप्राप्त उपसिद्धान्त असा निघतो कीं कोणत्याहि धंद्यांतल्या माणसाला सार्वजनिक जीवनांत भाग घ्यायची परवानगीच असूं नये. पण मग सार्वजनिक कार्य करणाऱ्यांचा एक स्वतंत्र धंदाच निघाला पाहिजे. त्यांतील कार्यकर्त्यांना चरितार्थाचें असें दुसरें कांहीं साधन असणार नाहीं. नाहीं तर जुन्या काळांतील भाडोत्री सैनिकांप्रमाणें तरी या सार्वजनिक कार्यांतूनच त्यांचा चरितार्थ चालला पाहिजे. शिवाय दुसरें असें कीं, वरील युक्तिवाद आपल्या लोकशाहीच्या घोषित ध्येयाशीं कसा सुसंगत ठरतो ? नागरिकाच्या ठिकाणीं अमके सद्गुण असावेत, त्यानें समाजकार्य आपण होऊन करावें असा जो आपण उच्च कंठरवानें उद्घोष करीत असतो त्याचें मग काय ? कदाचित् असा घोष करणें हें केवळ आपल्या व्यावसायिक कर्तव्यांपैकींच एक असेल; व्यक्तिशः आपणाला त्याची बाधा थोडीच होणार !

अध्यापकाला आवश्यक असे गुण अंगीं येणें आणि सार्वजनिक कार्यापासून अलिप्त रहाणें या दोन गोष्टींत कांहीं कार्यकारणसंबंध आहे कीं काय हें प्रत्येकानें स्वतःशींच विचार करून ठरवलें पाहिजे. कित्येकदां तर असें आढळून येतें कीं, ज्या माणसाला सार्वजनिक कार्यांत गोडी वाटत नाहीं, त्याला कशांतच – आपल्या शैक्षणिक अध्यापकीय कामांतहि – गोडी वाटत नसते ! शिवाय, सार्वजनिक कार्य करण्यासंबंधींच्या या मज्जाबाचें पर्यवसान अनेक वेळां असें होतें कीं विद्यापीठीय क्षेत्रांतला मनुष्य करमणूकीच्या क्लबांत जाऊन किंवा लब्धप्रतिष्ठितांच्या अड्ड्यांत स्वतःला गुतवून आपल समाधान करून घतो.

### क्रियाशील राजकारण व निष्क्रिय राजकारण !

शिक्षणक्षेत्रांतील लोकांनीं प्रत्यक्ष क्रियाशील राजकारणांत भाग घ्यावा किंवा नाहीं याबाबत तर खूपच वैचारिक गोंधळ माजलेला दिसून येतो. 'राजकारण' म्हणजे काय आणि त्यांतहि पुन्हां 'प्रत्यक्ष क्रियाशील राजकारण' म्हणजे काय – याची कोणी सुस्पष्ट व्याख्या केलेली नाहीं. क्रियाशील राजकारण म्हणजे काय ? एखाद्या राजकीय पक्षाचे सभासद असणें, प्रचलित सरकारवर किंवा विरोधी पक्षावर त्याच्या धोरणाबाबत किंवा मतांबाबत टीका करणें म्हणजे क्रियाशील राजकारण समजावें काय ? भाषावार राज्यें असावींत कीं नसावींत हें प्रतिपादन करणें आणि त्याविषयींचीं मतें प्रभावी करण्याकरितां स्थापन झालेल्या सर्वपक्षीय संघटनेंत सामील होणें हें क्रियाशील राजकारणांत पडूं शकतें काय ? विधिमंडळांतील शिक्षकांकरितां असलेल्या राखीव जागेकरितां उभें रहाणें हें क्रियाशील राजकारण होऊं शकतें काय ? – 'राजकारण' या शब्दानें इतक्या विविध प्रकारच्या कृती संभवतात कीं शेवटीं कृतिशील राजकारण म्हणजे काय आणि निष्क्रिय राजकारण म्हणजे काय हें ठरविणें प्रत्येक व्यक्तीकडेच सोंपवावें लागेल. राजकारणापासून संपूर्णपणें अलिप्त रहाणें कसें शक्य आहे याची कल्पना करणेंहि कठिण आहे. अध्यापकाला राजकारणच असूं नये, अध्यापक म्हणजे केवळ शरीररहित भावनाशून्य, मानवताशून्य बुद्धि – मग ती बुद्धि श्रेष्ठ, कनिष्ठ वा परोपजीवी कशी का असेना – अशी जर अध्यापकाची व्याख्या कोणी करीत असेल तर मात्र गोष्ट वेगळी ! राजकारणाबाबत आपल्या देशांत जो विचार एका ठराविक चाकोरींतून होत आला आहे, त्यामुळें 'राजकारण' हा शब्द शिक्षणक्षेत्रांत उच्चारण्याचीच खोटी कीं त्याचा धिक्कार ठरलेला ! याचें कारण काय असावें ? राजकारणांत ज्या पद्धती अवलंबिल्या जातात त्यांच्याबद्दल अत्यंत वीट आल्यामुळें हें होत असेल असें म्हणावें, तर दुसरीकडे विद्यापीठाच्या क्षेत्रांतील सर्वच नसल्या तरी कांहीं निवडणुकांतून आपण ज्या पद्धतींचें प्रदर्शन मांडलें आहे तें पाहून प्रत्यक्ष राजकारणी लोकहि लज्जेनें मान खालीं घालतील !








खरें कारण निराळेंच आहे. प्रतिकार करण्याचें शक्य तों टाळावें, ज्याची चढती दिसत असेल त्याच्या बाजूला उभें रहात जावें, वरून आलेलें धोरण व निर्णय चुकीचें आहेत हें माहीत असून देखील त्यांना खुशाल सुस्तपणें मान तुकवीत रहावें ही जी अनिष्ट वृत्ति त्यांत हें कारण सांपडूं शकेल.

## राजकारणी लोकांचा पगडा

शिक्षकांनीं राजकारण वर्ज्य करावें असा उपदेश मोठी विद्वत्ता अंगीं असलेले व त्या मोठ्या विद्वत्तेपेक्षांहि अधिक मोठें अधिकारपद असलेले लोक मुक्तकंठानें नेहमींच करीत असतात. परंतु कोणाची इच्छा असो वा नसो, राजकारणच विद्यामंदिरांतून कसें घुसत चाललें आहे याचा गंभीरपणें विचार क्वचितच झालेला दिसतो. शिक्षणसंस्थांच्या चालू खर्चाकरितां मदत, इमारती, प्रयोगशाळा व शिक्षणसाहित्य यांकरितां लागणारें साहाय्य, शिष्यवृत्त्या, ग्रंथप्रकाशनाकरितां मदत इत्यादि ज्या शैक्षणिक जीवनावर परिणाम घडवून आणणाऱ्या हरएक गोष्टी त्या सर्व राजकारणी लोकांकडून अगदीं राजकीय मुद्द्यांवर ठरविल्या जातात. शिक्षणाचें माध्यम काय असावें, परीक्षा कोणत्या पद्धतीनें घेतल्या जाव्यात, पाठ्यपुस्तकें नेमण्यांत काय धोरण स्वीकारावें इत्यादि प्रश्न राजकारणी पुरुषांकडून फार महत्त्वाचे गणले जातात. या शिक्षणक्षेत्रान्तर्गत प्रश्नांचा निर्णय करण्याची मुभा अध्यापकांस द्यावयास हे राजकारणी लोक तयार नाहींत. विद्यापीठांच्या संघटनांमधून, मंडळांतून या अध्यापकेतर राजकारणी मंडळींनाच महत्त्वाचें, कित्येक वेळां तर निर्णायक असें श्रेष्ठ स्थान मिळालें आहे! राजकीय पक्ष देखील या विद्यापीठीय मंडळांना राजकारण दूर ठेवून आपला कारभार करूं देत नाहींत. विद्यापीठांतील निरनिराळ्या मंडळांकडे दृष्टि टाकल्यास, हीं मंडळें म्हणजे बाहेर नको असलेल्या राजकारणी लोकांना अन्यत्र गुंतवून ठेवण्याचीं स्थानेंच आहेत कीं काय असें वाटून जातें! महत्त्वाकांक्षी राजकारणी पुढारीहि या विद्यापीठीय मंडळांचा आपला फावल्या वेळचा एक उद्योग म्हणून आणि राजकीय प्रचाराचें एक व्यासपीठ म्हणून उपयोग करीत असतात. विद्यापीठीय कारभाराचें नियोजनहि एक राजकारणी तंत्रच बनत आहे. तेथेंहि पक्षाचा प्रतोद नेमणें वगैरेसारख्या नियंत्रणाच्या पद्धती अवलंबिल्या जात आहेत. मात्र, विद्यापीठीय मंडळांचा हा जो प्रामुख्यानें शैक्षणिक असाच कारभार त्यांत जर अध्यापक भाग घेऊं लागले तर जणूं कांहीं त्यांनीं लज्जास्पद कृत्य केलें आहे असें समजलें जाऊन 'राजकारणांत तोंड खुपसणारे' अशी त्यांची बदनामी होते!

शिक्षकानें समाजापासून विलग किंवा अलिप्त रहाणें या गोष्टीला पूर्वीं कांहीं अर्थ वा मूल्य असेल तें असो. पण आज तरी ती केवळ काल्पनिक ( Myth ) गोष्ट आहे. खरें म्हणजे, शिक्षक समाजापासून अलिप्त रहाणें शक्यच नाहीं. म्हणून राजकीय शक्तींचें असहायपणें एक खेळणें बनायचें कीं त्या शक्तींवर आपल्या कुवतीप्रमाणें परिणाम घडवून आणायचा हें ज्याचें त्यानें ठरवावयाचें आहे.

## अध्यापकाच्या विकासांत विद्यार्थ्यांचा विकास

प्रचलित परीक्षापद्धतीमुळें विद्यार्थ्यांच्या व्यक्तित्वविकासाचें मोजमाप परीक्षा होऊं शकत नाहीं याबद्दल आपण चिन्ता व्यक्त करतों. परंतु विद्यार्थ्यांच्या व्यक्तित्वाचा विकास करण्याकरितां आपल्या वांट्याचें कार्य आपण खरोखरी करीत आहों काय, याचा कधीं विचार आपणांस सुचतो का? आपल्या कुचंबलेल्या व्यक्तित्वामुळें विद्यार्थ्यांच्या व्यक्तित्वाचीच आपल्या हातून हानि तर होत नसेल ना, असा आपण शिक्षक कधीं विचार करतों का? – खरी गोष्ट अशी आहे कीं, शिक्षकाचें व्यक्तित्व जसें त्याच्या स्वतःच्या उन्नतीच्या दृष्टीनें, तसेंच त्याच्या हाताखालीं शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्याहि उन्नतीच्या दृष्टीनेंहि विकसित झालें पाहिजे. पण या मूलभूत गोष्टीकडे कानाडोळा करण्याची सर्वसाधारण प्रवृत्ति आढळून येते. एखाद्या प्रौढ शिक्षकाला "तूं प्रचलित ज्वलन्त प्रश्नांवर आपलें मत देऊं नकोस, सार्वजनिक कार्यांत भाग घेणें हें नागरिक म्हणून तुझें रीतसर कर्तव्य असलें तरी त्यांत भाग घेऊं नकोस, सार्वजनिक कार्यांत नेतृत्व करूं नकोस" असें म्हणणें म्हणजे एक लुळ्यापांगळ्या खुरटलेल्या व्यक्तित्वाचा विकलांग मनुष्य शिक्षकाचें काम समर्पक रीतीनें करायला अत्यंत लायक होय असा युक्तिवाद करण्यासारखेंच होय!

अर्थात् याचा रोख असा नव्हे कीं प्रत्येक शिक्षकानें सार्वजनिक कार्याच्या रूपानें 'श्रमदान' केलेंच पाहिजे. 'श्रमदान' करणें ही गोष्ट त्या त्या व्यक्तीचा स्वभाव, सामर्थ्य, प्रवृत्ति आणि परिस्थिति यावर अवलंबून

आहे. या सर्व गोष्टी जेथें अनुकूल आहेत तेथें जर कोणी आपली क्रियाशील प्रवृत्ति त्या रूपानें प्रगट केली तर त्यांनीं आपल्या व्यवसायाशीं विसंगत असें वर्तन केलें असें तरी म्हणूं नये.

आपण अशा काळांत रहात आहोंत कीं ज्या वेळीं अलिप्तता पाळणें याचा अर्थ नष्टच होऊन जाणें असा होऊं शकेल. आपण आपले दूर एकान्तांत बसून अलिप्तपणें विद्यासाधना करीत बसूं शकूं अशी जर आपण भलतीच समजूत करून घेऊं तर जें कांहीं थोडें स्वातंत्र्य, जी कांहीं थोडी प्रतिष्ठा, आपणांला शिल्लक राहिली आहे ती देखील चुटकीसरशी नष्ट होईल! या उलट, ज्यांना पुढें व मागें पहातां येतें अशा विचारवंतांनीं विद्यापीठांतून वा विद्यापीठाबाहेर सर्वत्रच धुमाकूळ घालणाऱ्या सर्वंकष राजकारणी कंपूशाहीविरुद्ध एकमुखानें आपला आवाज उठवून समयोचित निषेध केला पाहिजे. तें करावयाची खरी वेळ आजच आहे.

शिक्षकांचे वा विद्यार्थ्यांचे स्वभावतःच उत्स्फूर्तपणें उमळून येणारे क्रियाशीलतेचे, कर्तृत्वाचे, प्रयोगशीलतेचे झरे दडपून टाकून त्यांना शुष्क बनवितां कामा नये. जोंपर्यंत शिक्षक आपल्या अध्यापकीय कामांत हेळसांड करीत नाहीं, तोंपर्यंत नागरिक म्हणून त्याचीं जीं सामाजिक कर्तव्यें असतील त्यांवर नियंत्रण बिलकुल घातलें जाऊं नये, एवढेंच नव्हे तर सार्वजनिक जीवनांत भाग घेण्यास व अशा रीतीनें आपला अनुभव अधिकाधिक संपन्न करून आपलें व्यक्तित्व विकसित करण्यास त्यास प्रोत्साहनच दिलें पाहिजे. तरच, जिला 'सामाजिक मूल्यांची जिवंत जाणीव' ('the Contemporary Sense of Social Values') म्हणतां येईल ती शिक्षकाच्या ठिकाणीं विकसित होईल.

# शिक्षण आणि जीवन यांचा संबंध

श्री. एस्. एम्. जोशी

अलीकडे जो उठतो तो प्रचलित शिक्षणपद्धतीवर टीका करीत सुटतो. ही शिक्षणपद्धति बदलली पाहिजे, आमूलाग्र बदलली पाहिजे असें आग्रहानें प्रतिपादिलें जातें. नवभारताच्या निर्मितीच्या दृष्टीनें तरुण पिढीला जें शिक्षण द्यावयाचें तें फार महत्त्वाचें आहे यांत शंकाच नाहीं. जुनी समाजव्यवस्था विस्कळित होत आहे. कुटुंबसंस्था देखील पहिल्याप्रमाणें राहिलेली नाहीं. त्यामुळें मुलांच्या शिक्षणांतील गृहशिक्षणाबाबतची जबाबदारी पूर्ण करण्याच्या दृष्टीनें आम्ही पालक-मंडळी कमी पडत आहोंत, याची जाणीव झाली म्हणजे विद्यालयीन शिक्षणाचें महत्त्व प्रकर्षानें जाणवल्यावांचून कसें राहील? नवसमाजांतील नवमानव घडवण्याचें महान् विधायक कार्य शिक्षणसंस्थांवरच येऊन पडलें आहे. त्यांतहि महाविद्यालयांतून बाहेर पडणाऱ्या तरुणांच्यावर तर फार मोठी जबाबदारी पडते. त्या दृष्टीनें पहातां आजचा विद्यार्थी हा नवसमाजाच्या अपेक्षा पूर्ण करूं शकेल कीं नाहीं याबद्दल शंका वाटते. समाजाची नव्यानें घडी बसविण्याचें जें प्रचंड कार्य आपल्यापुढें आहे त्याची जाणीव जर आमच्या सुशिक्षित म्हणविल्या जाणाऱ्या तरुणाला नसेल तर शिक्षणामध्यें कांहींतरी न्यूनता आहे हें कबूलच केलें पाहिजे. वैयक्तिक स्वातंत्र्याच्या नांवाखालीं आज आमची तरुणमंडळी स्वार्थी होत असल्यासारखें दिसतें. स्वार्थ आणि वैयक्तिक स्वातंत्र्य यांत फरक करण्यास आपण शिकलें पाहिजे. ग्लॅडस्टननें एके ठिकाणीं असें म्हटल्याचें मला स्मरतें कीं, शिक्षणानें मनुष्य जर अधिकाधिक स्वार्थी बनत गेला आणि आपल्या गरजा भागविण्याच्या नांवाखालीं समाजहिताकडे दुर्लक्ष करूं लागला तर तें शिक्षण चुकीचें आहे असें समजलें पाहिजे. सुशिक्षित मुलगा जर आपल्या गरजांच्यासाठीं कुटुंबीयांसंबंधींच्या आपल्या जबाबदाऱ्या टाळूं लागला तर त्याला शिकवून काय उपयोग, असेंच पालक म्हणणार नाहींत काय? म्हणून मला असें वाटतें कीं प्राध्यापकांनीं विद्यार्थ्यांना शिकवितांना एक विचार नेहमीं मनांत बाळगला पाहिजे कीं, आपण ज्या गोष्टी शिकवीत आहों, जीं तत्त्वें प्रतिपादीत आहों त्यामुळें आपले विद्यार्थी समाजविन्मुख तर होणार नाहींत ना? — समाज असेल तरच आपण जगूं शकतों. मासे, मग ते लहान असोत अगर मोठे असोत, तळ्यांतच जगतात. तळेंच जर आटूं लागलें तर सर्वांचीच पांचावर धारण बसते. व्यक्ति आहे तशी समष्टि देखील आहे. तिचा विसर आपणांला पडतां उपयोगी नाहीं. आमच्या जीवनामध्यें








सामाजिकता ही एक वस्तू आहे. त्याशिवाय आपलें जीवन पूर्ण होऊं शकत नाहीं. याची जाणीव शिक्षणामुळें प्रत्येक विद्यार्थ्याला मिळाली पाहिजे. माझ्या दृष्टीनें आमच्या विद्यमान शिक्षणपद्धतींत आणि प्रक्रियेमध्यें सामाजिक जाणिवेचा अभाव आहे. हा दोष आजचा नाहीं, ब्रिटिश राजवटीपर्यन्त त्याचीं पाळेंमुळें पोंचलेलीं आहेत. ब्रिटिश राजवट गेली असली तरी त्यांनीं घातलेल्या दुष्ट परंपरा अद्याप नष्ट झालेल्या नाहींत. त्यासाठीं आमच्या मूळ कल्पनांमध्यें आमूलाग्र बदल होणें आवश्यक आहे.

## शिक्षणसंस्था कीं हमालखाने ?

शिक्षणांतील ही उणीव लक्षांत घेऊनच टिळक–आगरकरांनीं पहिल्याप्रथम तरुणपिढीच्या शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला. महात्मा गांधींनीं राष्ट्रीय शिक्षणाचा कार्यक्रम दिला. त्यावेळच्या शिक्षणसंस्थांतून तयार होणारे सुशिक्षित समाजहितदक्ष तर नाहींच, परंतु आपल्या वैयक्तिक स्वार्थासाठीं समाजहितविरोधी जीवन जगूं लागलेले पाहिल्यावर त्यांनीं शिक्षणावर कडाडून हल्ला करावा यांत आश्चर्य कोणतें ! म्हणूनच ते शिक्षणसंस्थांना हमालखाने म्हणत. कारण त्यांनीं निर्माण केलेले पदवीधर ब्रिटिशांची राजवट चालूं ठेवण्याचें काम आपल्या अंगावर घेऊन जनतेच्या गांजणुकीला कारणीभूत होत असत. त्या जमान्यामध्यें तरुण पिढीला त्यावेळची मुख्य सामाजिक समस्या कोणती आणि त्यासाठीं आपण काय केलें पाहिजे हें सांगितलें जात नव्हतें. देशाचें स्वातंत्र्य मिळविणें हें आपलें ध्येय आहे याची जाणीव विद्यार्थ्यांना मिळत नव्हती. देश स्वतंत्र झाला पाहिजे याबद्दल मूक संमति आणि कित्येक वेळीं सहानुभूति देखील होती. परंतु त्यासाठीं प्रत्यक्ष प्रयत्न तर दूरच राहिले परंतु विषयाच्या अनुषंगानें देखील त्याची आठवण करून दिली जात नसे. प्रत्येक युगामध्यें समाजाचें एक सामूहिक उद्दिष्ट असतें. तें उद्दिष्ट विद्यार्थ्यांच्या आणि शिक्षकांच्या मनांत अव्याहतपणें ठाण मांडून बसलेलें पाहिजे. एखाद्या पार्श्वसंगीतासारखी त्याची जोड आपल्या प्रत्येक कार्यांत असली पाहिजे. ज्यांच्या मनांत बाह्य परिस्थितीमुळें ही भूक निर्माण झालेली असेल त्यांचे समाधान प्राध्यापकांकडून होत नसे आणि साहजिकच विद्यार्थ्यांचा ओढा राजकीय पुढाऱ्यांकडे होई. 'स्टोन्स ऑफ व्हेनिस्' पुस्तक आमच्या एका परीक्षेला होतें. शिकवण प्राध्यापक देखील व्यासंगी होते. परंतु रस्किनबद्द माहिती सांगतांना रस्किनच्या 'अनटु धिस् लास्ट ('Unto This Last') या पुस्तकांतील महा तत्त्वाचा उल्लेख कांहीं आमच्या प्रोफेसरांनीं केलेल माझ्या स्मरणांत नाहीं. समाजवाद, साम्यवाद इत्या गोष्टी त्यावेळीं विद्यार्थ्यांच्या मनांत होत्या. अशा वेळ प्राध्यापकांनीं त्याबाबत आम्हाला कांहीं मार्गदर्श करायला नको होतें काय ? त्यावेळीं खादीची चळव होती. खादीबद्दल आम्हाला नीट माहिती मिळणें आव श्यक होतें. परंतु त्या वेळीं अशी कल्पना होती कीं कांहींतरी 'फॅड' आहे. आणि त्याबाबत शास्त्री दृष्टिकोनांतून माहिती देण्याऐवजीं खादीची टिंगल केली जाई. आज आतां मोठमोठे अर्थशास्त्रा प्राध्यापक देखील ग्रामोद्योगांचें महत्त्व प्रतिपा लागले आहेत. निदान विद्यमान परिस्थितींत अधिका धिक लोकांना कामधंदा मिळवून देण्याच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व मान्य करण्यांत येत आहे. ही गोष्ट ज वेळींच आमच्या निदर्शनाला आणण्याचा प्रयत्न झाल असता तर सामाजिक उद्दिष्टाच्या दृष्टीनें तें हितावह झालें नसतें काय ?

## युगधर्माची जाणीव

माझ्या म्हणण्याचा अर्थ असा नाहीं कीं प्राध्यापकांनीं दैनंदिन राजकारणाच्या दृष्टीनें महाविद्यालयांचा उपयोग करावा. शिक्षकांनीं आणि प्राध्यापकांनीं राजनैतिक क्षेत्रांत कितपत भाग घ्यावा हा प्रश्न विवाद्य आहे. मी ज्या वेळीं सामाजिक ध्येयाचा उल्लेख करतों त्यावेळीं मला दैनंदिन आणि पक्षीय राजकारण अभिप्रेत नाहीं. देशांत पक्ष कितीहि असले तरी त्यांपैकीं बहुसंख्य पक्षांना एक विशिष्ट सामाजिक उद्दिष्ट मान्यच करावें लागतें. त्याला आपण युगधर्म म्हणतों. परकीय अंमल असतांना आमचें उद्दिष्ट स्वातंत्र्य हें होतें आणि स्वातंत्र्य हाच त्या वेळचा युगधर्म होता. आतां स्वातंत्र्य प्राप्त झालें असून आतां आपणाला त्यापुढचा टप्पा गांठावयाचा आहे. सामाजिक आणि आर्थिक समतेवर आधारलेला नवसमाज निर्माण करणें हें आतां आमचें ध्येय आहे. सर्वसाधारणतः त्याला 'समाजवाद' अशी संज्ञा दिली जाते. उद्दिष्टाच्या दृष्टीनें



अनुक्रमणिका






आतां कॉंग्रेसला देखील समाजवादाच्या ध्येयाला मान्यता द्यावी लागत आहे. स्वातंत्र्याच्या लढ्याच्या वेळीं नेहरूंनीं समाजवादावरील आपली निष्ठा एकवेळ व्यक्त केली तेव्हां मुंबईच्या बड्या भांडवलदारांनीं त्याविरुद्ध एक पत्रक काढून कॉंग्रेसचें तें ध्येय नव्हे असें कॉंग्रेसला बजावलें होतें. आजहि त्यांपैकीं कांहीं मंडळी समाजवादाविरुद्ध बोलत आहेत. परंतु आतां समाजवादाला शाब्दिक तरी मान्यता देणे कॉंग्रेसला अपरिहार्यच होऊन बसलें आहे. समाजवाद हा आजचा युगधर्म आहे. तें आजचें सामूहिक उद्दिष्ट आहे. त्या धर्माची विद्यार्थ्यांना जाणीव करून देऊन त्याबाबत त्यांनीं आपली जबाबदारी उचलावी अशी शिकवण आम्ही तरुणपिढीला दिली पाहिजे. हें समाजाबद्दलचें कर्तव्य आमच्या शिक्षकांनीं आणि प्राध्यापकांनीं पार पाडलें पाहिजे. तशी अपेक्षा जनतेनें करणें चुकीचें होईल काय ? दैनंदिन राजकारणामध्यें कार्यक्रमाबाबत मतभेद होणें स्वाभाविक आहे. परंतु विशिष्ट युगांतील प्रमुख सामाजिक उद्दिष्टांबद्दल विद्यार्थ्यांच्या मनांत जिव्हाळा निर्माण करणें यांत मतभेद होण्याचें कारण नाहीं.

तरुण पिढीच्या अंतःकरणांत सामाजिक आणि आर्थिक समतेची आकांक्षा जागृत करणें हेंच आजच्या शिक्षणाचें नैतिक अधिष्ठान असलें पाहिजे. त्या दृष्टीनें प्राध्यापकांनीं आपलें कर्तव्य पूर्ण करावयाचें आहे. समाजाच्या मुख्य आकांक्षांशीं आमच्या शिक्षणाचा संबंध राहिला नाहीं तर त्या शिक्षणाचा काय उपयोग ? सुशिक्षित लोकांचा वर्ग हा एकंदर समाजापेक्षां निराळा बनतां कामा नये, समाजजीवनाशीं त्याची फारकत होतां उपयोगी नाहीं. आमचें शिक्षण जीवनस्पर्शी झालें पाहिजे. अितिहास, भूगोल, साहित्य, शास्त्र वगैरे विषय शिकवितांना त्या विषयाचा आपल्या जीवनाशीं कसा संबंध पोंचतो तें विशद करून दाखविण्याची कला व सामर्थ्य प्राध्यापकाच्या ठिकाणीं असलें पाहिजे. याच अर्थानें मी, शिक्षण जीवनस्पर्शी झालें पाहिजे, असें म्हणतों. विद्यार्थ्यांमध्यें आज ज्ञानार्जनाबद्दल पुरेशी आस्था दिसत नाहीं. त्याला अनेक कारणें असूं शकतील. परंतु शिक्षण जीवनस्पर्शी नसल्यामुळे देखील तसें होत असण्याचा संभव आहे. मी विद्यार्थी होतों त्या वेळीं जो विद्यार्थी स्कॉलर असेल त्याच्याबद्दल आम्हाला प्रेमादर वाटे. फेलो होण्यांत कांहींतरी विशेष आहे असें समजलें जाई. आज अभ्यासू विद्यार्थी अभ्यास करतात, पहिल्या वर्गांत येतात, परंतु त्यांच्याबद्दल सर्वसामान्य विद्यार्थ्यांच्यामध्यें प्रेमादर नाहीं. उलट, पुस्तकांतले किडे म्हणून त्यांची हेटाळणी होत असण्याचा संभव आहे. ही परिस्थिति स्वागतार्ह तर नाहींच परंतु अनिष्ट समजली पाहिजे. शिक्षणाचा संबंध आमच्या जीवनाशीं अविभाज्य रीत्या जोडून दिला तर ही अनास्था कमी होऊं शकेल. कारण, विद्यार्थी ज्ञानार्जनाबाबत उदासीन असले तरी जीवनाबद्दल उदासीन नाहींत. त्याबद्दल त्यांना उत्साह आहे; पूर्वीच्या पिढींत होता त्यापेक्षां कांकणभर अधिकच आहे असें म्हटलें तरी चालेल. मग अभ्यासू विद्यार्थ्यांबद्दल हा अनादर कां ? महाविद्यालयीन शिक्षकांनीं या गोष्टीचा गंभीरपणें विचार केला पाहिजे. अभ्यास करून आणि चांगले मार्क मिळवून त्याचा काय उपयोग, असें त्यांना वाटतें काय ? तें खरें असेल तर जीवनापासून आजच्या शिक्षणाची फारकत झालेली आहे असाच त्याचा अर्थ होत नाहीं काय ? आमच्या विद्येचा जीवनाशीं दुवा जुळवून देणें त्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. शिक्षक आणि समाज या विषयाचा विचार करतांना आजच्या विद्यार्थ्यांकडून अभ्यासाची अशी उपेक्षा कां होत आहे या प्रश्नाचा उकल शिक्षकांनीं केला पाहिजे.

### शिक्षणांतील महत्त्वाची समस्या

विद्यार्थ्यांच्या मनामध्यें आर्थिक आणि सामाजिक समतेची आकांक्षा निर्माण करणें हेंच विद्यमान शिक्षणपद्धतीचें नैतिक अधिष्ठान असलें पाहिजे असें मी म्हटलें. प्रत्येक व्यक्तीच्या आणि समाजाच्या जीवनामध्यें कांहींतरी मानबिंदु असावा लागतो. जो मानबिंदु दुखावला तर जीवन नकोसें होतें. प्रत्येक शिक्षकानें या दृष्टीनें आपल्या विद्यार्थ्यांच्या जीवनाचा शोध घेतला पाहिजे. आज तरी बहुसंख्य विद्यार्थ्यांच्यामध्यें तसा मानबिंदु आढळणें कठीण आहे. जी परिस्थिति येईल त्या परिस्थितींत ते जगून रहायला तयार आहेत, ही खरोखर शोचनीय अवस्था आहे. विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं कांहींतरी नैतिक अधिष्ठान प्राप्त करून देणें हें आपण जीवनाचें सर्वश्रेष्ठ मूल्य म्हणतों. ‘ सत्यमेव जयते ’ हें आपलें बोधचिन्ह आहे. परंतु









प्रत्यक्ष व्यवहारांत काय दिसतें ? लोक म्हणतात कीं, खोटें केल्याशिवाय मनुष्य जगूंच शकणार नाहीं. हें जगणें कोणत्या प्रकारच आहे ? तें जगणें तरी आहे काय ? माणसें जन्माला आलीं म्हणून तीं जगताहेत. मेलेलीं नाहींत म्हणून जिवंत आहेत इतकाच त्याचा अर्थ आहे. जीवितहेतु समजून घेऊन जगणें यालाच जगणें ही संज्ञा प्राप्त होऊं शकेल. निदानपक्षीं जीवितहेतु काय आहे याची जिज्ञासा उराशीं बाळगून त्याचा शोध घेत रहाणें प्रत्येकाला शक्य आहे. परंतु तसें कांहीं घडत असल्याचें दिसत नाहीं. तीच गोष्ट समाजाची. शतकानुशतकें आमचा समाज जिवंत राहिला आहे येवढयावरून आमची संस्कृति सिद्ध होत नाहीं. आमच्या समाजाचें जीवन योजनाबद्ध आहे काय ? आपलें उद्दिष्ट काय आहे आणि तें कसें साध्य करावयाचें याची सामूहिक जाणीव असेल तरच त्याला कांहीं अर्थ आहे. त्यालाच आपण युगधर्म असें म्हणतों. तो युगधर्म काय आहे तें शिक्षकानें समजून घेतलें पाहिजे, तें समजून घेण्याचा अखंड प्रयत्न केला पाहिजे. त्याचा बोध झाला तरच व्यक्तीच्या जीवनाला नैतिक अधिष्ठान प्राप्त करून देतां येईल. त्यावरूनच आमच्या जीवनांतील मानबिंदु ( point of honour ) कोणता तें ठरणार आहे. व्यक्ति आणि समाज यांच्या जीवनामध्यें असा मानबिंदु निर्माण करून देणें हीच माझ्या दृष्टीनें शिक्षणांतील महत्त्वाची समस्या आहे. स्वातंत्र्यलढयाच्या काळांत परकीयापासून स्वातंत्र्य मिळविणें ही आमच्या समाजाची प्रमुख आकांक्षा होती. तीच आमची जीवननिष्ठा होती. त्यामुळें आमच्या जीवनाला अर्थ प्राप्त झाला होता, त्याचें नियोजन आणि नियमन होत होतें. नव्या जमान्यांतील आमचें सामूहिक उद्दिष्ट कोणतें तें एकवेळ समजून घेतलें आणि त्यासाठीं आम्ही आपलें जीवन जगूं लागलों म्हणजे आमच्या जीवनाचें नियोजक तत्त्व आम्हांला सांपडल्याचा अनुभव येईल. आजचें फुटलेल्या नळासारखें जीवन संपून व्यक्तीच्या जीवनांत आपोआप शिस्त निर्माण होईल.

## शिक्षण आणि जीवन यांचा संबंध

शिक्षकांनीं एकदां ही गोष्ट समजून घेतली आणि नवसमाजनिर्मितीच्या महान् विधायक कार्यांत आपलें स्थान कोणतें आणि काम कोणतें याची जाणीव झाली म्हणजे त्यांचें सामर्थ्य वाढेल. विद्यार्थ्यांच्यावर आज त्यांचें जें वजन आहे तें वाढेल. विद्यार्थ्यांच्या मनावर संस्कार करण्याची त्यांची शक्ति वाढेल. आपोआपच विद्यार्थी मार्गदर्शनासाठीं शिक्षकांकडे वळतील. अर्थातच शिक्षकांचें जीवन देखील सामाजिक उद्दिष्टाबरोबर एकतान झालेलें असावयास हवें. त्यांच्या दैनंदिन व्यवहारांत आणि आचरणामध्यें विद्यार्थ्याला त्या ध्येयाचा साक्षात्कार झाला पाहिजे. आपण डॉक्टर, एंजिनियर, तंत्रज्ञ वगैरे कशासाठीं व्हावयाचें असें आज जर विद्यार्थ्याला विचारलें तर तो म्हणेल कीं नोकरी मिळावी म्हणून, पैसे मिळवावे म्हणून. माझ्या समाजाला आज डॉक्टरांची जरूरी आहे, एंजिनियरांची वाण आहे, शेतीतज्ज्ञांची आवश्यकता आहे, असा विचार फारच थोड्या विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविला जात असेल ! आणि कोणी तसें सांगत असेल तर प्रत्यक्ष उदाहरणें अगदीं निराळ्या प्रकारचीं आहेत. मोठा डॉक्टर कोण ? तर ज्याची प्रॅक्टिस हजारों रुपयांची आहे तो असें आम्हांला वाटतें. म्हणूनच शिक्षकाला आज कोणी महत्त्व देत नाहीं. पैसा हें एकच मूल्य होऊन बसलें आहे. आणि ज्ञानाला कोणी इतकें महत्त्व देत नाहीं. ही स्थिति बदलली पाहिजे. समाजाच्या उपयोगीं पडल्यानें जीवनामध्यें प्रसन्नता येऊं शकते याची कल्पना आमच्यापैकीं बहुसंख्य विद्यार्थ्यांना नाहीं. गोखले, टिळक, आगरकर, गांधी यांचे आदर्श डोळ्यापुढें होते म्हणून एक पिढी निर्माण झाली. ती परंपरा टिकली पाहिजे. ज्ञानोपासना आणि लोकसेवा अव्याहतपणें चालूं ठेविली पाहिजे. शिक्षण आणि जीवन यांचा संबंध कसा जोडावा हें जर आपणाला समजलें तर आजच्या शिक्षणांतील एक महत्त्वाची उणीव भरून निघेल. आज देखील कांहीं शिक्षक अशा प्रकारचा प्रयत्न करीत आहेत. लोकसेवेचीं आणि श्रमदानाचीं कामें करून आपल्या ज्ञानसाधनेंत प्रगति करीत आहेत. परंतु त्याचें श्रेय आजच्या शिक्षणसंस्थांकडे फारसें जाणार नाहीं. जे शिक्षक अशीं कामें करीत आहेत ते स्वतःच्या प्रेरणेनें अथवा अन्य संस्थांच्या तत्त्वावधानाखालीं करीत आहेत. शिक्षणसंस्थांनीं त्याचा अंगीकार करून शिक्षणपद्धती मध्यें त्याचा अंतर्भाव होईल तेव्हांच हा प्रश्न सुटे








# ज्ञानसाधना हीच शिक्षकाची जीवनसाधना

प्रा. प्र. रा. दामले

[१] समाजांतील विविध गटांचा एक घटक म्हणून इतर अनेक घटकांप्रमाणें शिक्षकावरहि समाजाचें फार मोठें ऋण असतें. त्याबद्दल समाजासंबंधीं शिक्षकांचीं कांहीं कर्तव्यें असतात. उलट, समाजाचीहि अध्यापकासंबंधीं इतर घटकांइतकीच नव्हे तर त्याहून कांहींशी अधिकच जबाबदारी असते. कारण, सामाजिक जीवनाच्या संवर्धनाच्या कार्यामध्यें शिक्षकानें महत्त्वाचा हिस्सा उचलावा अशी त्याच्याकडून अपेक्षा असते. या तात्त्विक मुद्द्यांवर कोणाचे फारसे मतभेद होतील असें वाटत नाहीं. परंतु हें तत्त्व प्रत्यक्ष व्यवहारांत आज कसे आणतां येईल याचा विचार करूं लागलें तर प्रामुख्यानें जे प्रश्न उत्पन्न होतात ते असे :

१ शिक्षकाभोंवतालचा आजचा समाज त्याचें सामाजिक दृष्टीनें मूल्य काय करीत असतो ?

२ आजच्या सामाजिक जीवनामध्यें शिक्षकानें कोणता भाग घ्यावा ?

या प्रश्नांचीं उत्तरें माझ्या दृष्टीनें थोडक्यांत पुढील प्रमाणें देतां येतील :

आजच्या अध्यापकवर्गाकडे आपला समाज मोठ्या आदरानें पहात आहे असें दिसत नाहीं. निरनिराळ्या वेळीं समाज शिक्षकांचीं वर्णनें कशीं करतो यावरून त्याचें धोरण ठरविलें जाऊं नये, तर प्रत्यक्षांत शिक्षकांसाठीं समाज काय करायला तयार आहे यावरून त्याचा निर्णय दिला जावा. आपला देश गरीब आहे. म्हणून इतर देशांतील शिक्षकांना ज्या सुखसोयी मिळतात त्या मिळण्याची अपेक्षा आपणांस बाळगतां येणार नाहीं. शिवाय, त्या सर्व सुखसोयी आवश्यक आहेत असेंहि नाहीं. परंतु असें असलें तरी आज जी रक्कम खर्च करतां येणें शक्य आहे, त्या रकमेंतून तरी शिक्षणावर योग्य प्रमाणांत खर्च होतो कीं काय हा प्रश्न आहे. याबाबत असें दिसतें कीं आजच्या शिक्षकांच्या पगारांत तर सुधारणा झाली पाहिजेच परंतु त्यांच्या एकूण संख्येंतहि वाढ झाली पाहिजे. शिवाय महाविद्यालयें आणि विद्यापीठें यांमधील विद्यार्थी आणि अध्यापक यांच्या इतर सवलती व साधनें यांतहि वाढ झाली पाहिजे. परंतु इतर क्षेत्रांप्रमाणें याहि ठिकाणीं केवळ घोषवाक्यें आणि मोठमोठे शब्द प्रत्यक्ष कार्याच्या आड येतात असें दिसून येतें. आदर्श शिक्षकाला केवळ कोरडी सहानुभूति दाखविली कीं, प्रत्यक्ष शिक्षकांविषयींचें आपलें कर्तव्य पार पडलें असें आम्हांस वाटतें. समाज व अध्यापक यांचे असे संबंध कां निर्माण झाले याची समीक्षा झाली पाहिजे. याबाबत एक कारण असें देतां येईल कीं समाजाला आपली उपयुक्तता पटवून देण्याच्या कामीं शिक्षक फारसा यशस्वी झाला नाहीं. समाजानें अध्यापकवर्गाबद्दल योग्य कर्तव्य बजावलें नाहीं हें खरें. परंतु आपण तरी समाजमनामध्यें आपल्याविषयीं आदर आणि विश्वास कां निर्माण करूं शकलों नाहीं असा प्रश्न शिक्षकांनीं स्वतःला विचारला पाहिजे.

आपल्या अपयशाचीं माझ्या मतें दोन कारणें दिसतात. एक असें कीं ज्ञानसाधना ही जीवनसाधना म्हणून आपण अंगिकारलेली नाहीं. दुसरें कारण असें कीं ग्रंथांचा अभ्यास व ज्ञानार्जन हें जें आपलें किमान कर्तव्य त्याविषयीं सुद्धां आपणांमध्यें पुरेशी आस्था दिसून येत नाहीं.

माझी अशी ठाम समजूत आहे कीं आपल्या कार्यांत आपण अविश्रांत परिश्रम घेतल्याशिवाय आणि आपल्या व्यवसायाचा जीवनाशीं किती जिव्हाळ्याचा संबंध आहे हें लक्षांत घेतल्याशिवाय आपणांस आपल्या देशबांधवांचा आदर संपादन करणें कठीण आहे. आपल्या हातून जर खरोखरींच कांहीं चांगलें समाजोपयोगी काय निष्पन्न होऊं शकलें तर आपणांस न्याय्य इतकेंच नव्हे तर उदार वागणूक, न मागतां देखील, समाजाकडून मिळूं शकेल.

दुसरा प्रश्न म्हणजे समाजजीवनामध्यें अध्यापकांचें कार्य कोणतें ? – आपल्यापैकीं कांहींजणांना असें वाटतें कीं शिक्षक हा समाजाचा सुविद्य असा महत्त्वाचा घटक असल्यामुळें आपल्या आचरणानें आणि विचारानें समाजजीवन कसें जगावें याचा वस्तुपाठच त्यानें इतरांना दिला पाहिजे. हें समाजोन्नतीसाठीं अत्यंत आवश्यक आहे. राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, समाजशास्त्र,

[१] मूळ इंग्रजींतून लिहिलेल्या लेखाचा हा अनुवाद आहे— का. सं.

इतिहास या विषयांच्या बाबतींत उत्तरदायित्व शिक्षकांवर तर जास्तच प्रमाणांत पडत असतें. आपण नुकतेंच परदास्यांतून मुक्त झालों आहोंत. नव्या खंबीर लोकशाहीच्या निर्मितीमध्यें आपला देश निमग्न झाला आहे. या काळांत सुशिक्षित अध्यापकावरील सामाजिक जबाबदारी द्विगुणित होते. यास्तव शिक्षकाच्या स्वातंत्र्याचा परिघ विस्तारला पाहिजे. एक सामाजिक कार्यकर्ता म्हणून सामाजिक, राजकीय आणि आर्थिक प्रश्नांना सामावून घेईल एवढी त्याच्या कर्तव्याची व म्हणून स्वातंत्र्याची कक्षा रुंदावली पाहिजे. – अशी कांहींची विचारधारा आहे.

माझ्या मतें वरील प्रकारची विचारसरणी धोक्याची आहे. त्यामुळें आज खालावत चाललेला शैक्षणिक दर्जा आणखी जास्तच खालावेल. आणीबाणीचा प्रसंग सोडला तर शिक्षकानें आपल्या अध्यापनाच्या व्यवसायाला मोठ्या निष्ठेनें चिकटून राहिलें पाहिजे. दुसऱ्या कार्यक्षेत्रांत आपलें लक्ष जाऊं देतां कामा नये. आपल्या क्षेत्रांत पारंगतता मिळविली पाहिजे. अध्यापक हा एक सामाजिक कार्यकर्ता आहे हें खरें. परंतु आपलें समाजसेवेचें विशिष्ट अध्यापनाचें कार्यक्षेत्र त्यानें निवडलें आहे आणि म्हणून त्याच्याशींच त्यानें एकनिष्ठ राहिलें पाहिजे. खरोखर एका वेळीं एक माणूस अनेक कामें चांगल्या तऱ्हेनें पार पाडूं शकत नाहीं, त्यामुळें त्यानें निरनिराळ्या हालचालींमध्यें अंशतः जरी आपलें मन गुंतविलें तरी त्याचा अनिष्ट परिणाम त्याच्या अंगीकृत कार्यावर होणें अटळ असतें. असें झाल्यास समाजानें त्याच्याकडे सोंपविलेल्या कार्यामध्यें तो अयशस्वी झाला असेंच मानावें लागेल. पाश्चात्त्य शिक्षकाशीं आपल्या चांगल्या प्रतीच्या अध्यापकाशीं तुलना केली तर आपले शिक्षक पुष्कळच कमी पडतात. याचें प्रमुख कारण कोणतें असेल तर तें हेंच कीं आपल्या शिक्षकानें एकाच वेळीं अनेक कामांमध्यें आपलें लक्ष विचलित केलेलें असतें. आपल्या संस्थेच्या कारभाराची धुरा तर त्याला वहावी लागतेच परंतु इतरहि अनेक सामाजिक चळवळींमध्यें तो गुंतलेला असतो. शिक्षकाच्या या विविध सामाजिक हालचालींचें समर्थन करण्यासाठीं टिळक आणि गोखले यांचे दाखले वारंवार दिले जातात. परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं त्यांनीं जेव्हां राजकीय कार्याला स्वतःला वाहून घेतलें त्या वेळीं अध्यापनाच्या आपल्या व्यवसायाला त्यांनीं पूर्ण विराम दिला होता. दुसरें असें कीं ते सामाजिक कार्यकर्ते असूनहि ते चांगले शिक्षक राहूं शकले. परंतु ते जर पूर्णांशानें शिक्षकच राहिले असते तर याहूनहि ते मोठे शिक्षक झाले असते. शिवाय मोठ्या पुरुषांचीं उदाहरणें शब्दशः पाळणें अनेक वळीं घातक ठरतें. माझ्या आसपास वावरणाऱ्या कांहीं शिक्षकांचीं उदाहरणें माझ्या दृष्टीसमोर आहेत. ते चांगले संशोधक किंवा गाढ पंडित होऊं शकले असते. परंतु सामाजिक चळवळीच्या फसव्या विलोभनामुळें त्यांना तो दर्जा प्राप्त करून घेतां आला नाहीं. आपल्या व्यवसायावर श्रद्धा किंवा भक्ति असल्याशिवाय व्यक्तीच्या कार्यामध्यें तळमळ, निष्ठा किंवा समाधानी वृत्ति येऊं शकत नाहीं. आणि आपला व्यवसाय आणि जीवन यांचे अन्योन्यसंबंध ध्यानांत आल्यावांचून त्याची आपल्या व्यवसायावर अवश्य ती श्रद्धाहि बसत नाहीं. हें साधण्यासाठीं हातीं घेतलेल्या व्यासंगाशीं तो पूर्णपणें तद्रूप झाला पाहिजे. आपलें सारें व्यक्तिमत्त्व त्यानें आपल्या कामामध्यें ओतलें पाहिजे. अर्धवट व्यक्तिमत्त्व हें ओजस्वी किंवा परिणामकारक कार्य करूं शकत नाहीं. शिक्षणाच्या सर्व अवस्थांमधून जात असतांना शिक्षक आणि विद्यार्थी यांनीं आपल्या कार्यामध्यें सर्वस्व ओतलें पाहिजे. त्यांवांचून त्यांच्या कार्यांत जिवंतपणा येणें अशक्य आहे. त्यामुळें मला दोन प्रकारच्या सूचना करावयाच्या आहेत. आपला व्यवसाय हें देखील सामाजिक कार्य आहे असें मानून अध्यापकानें त्याच कार्याला वाहून घ्यावें व दुसऱ्या सामाजिक कार्याच्या कोणत्याहि विलोभनाला बळी पडूं नये. दुसरें असें कीं, आपल्या व्यवसायाचा जीवनाशीं काय संबंध आहे हें जाणून घेऊन त्यानें आपल्या धंद्यासाठीं तन-मन वेंचून त्याची निष्ठेनें उपासना करावी.

---

[ 'महाविद्यालयीन अध्यापक व समाज' या चर्चेतील प्रा. सौ. आचार्य यांच्या निबंधाचा सारांश पान ४५ वर शेवटीं पहावा. ]








श्री. चिं. त्र्यं. केंघे

# ज्ञानेश्वरीची भूमिका

ज्ञानेश्वरी हें मराठी भाषेचें अमोल लेणें आहे. ह्या ग्रंथाचें लेखन होऊन आज कित्येक शतकें उलटून गेलीं असलीं आणि ह्या अवधींत कित्येक सामाजिक आणि राजकीय घडामोडी झाल्या असल्या तरीहि ज्ञानेश्वरींतील नावीन्य आजहि मुळींच कमी झालेलें नाहीं. ह्या काव्यानें हजारों कवींना स्फूर्तीचा निर्मळ झरा पुरविला आहे, लाखों मुमुक्षूंना 'कैवल्यरस' चोगरला आहे, कोट्यवधि रसिकांना ब्रह्मानन्दसहोदर रसास्वादांत निमग्न केलें आहे. इंग्रजी राजवटीच्या प्रारंभीं पाश्चात्त्य विद्यांनीं मोहित झालेल्या विद्वानांचें इतर अनेक पौरस्त्य ग्रन्थांप्रमाणें ज्ञानेश्वरीकडेहि दुर्लक्ष झालें; परंतु पुनश्च ह्या ग्रन्थानें आपल्या विलक्षण सामर्थ्यानें विद्वानांचें लक्ष वेधून घेतलें आहे. आज नवनवीन दृष्टिकोनांतून ज्ञानेश्वरीचें विवेचन करण्याचा प्रयत्न अनेक विद्वान् करीत आहेत. ज्ञानेश्वरीच्या भूमिकेविषयीं आणि कार्याविषयीं नाना प्रकारचीं मतें प्रतिपादिलीं गेलीं आहेत. येथें ज्ञानेश्वरींतच ज्ञानेश्वरांनीं मांडलेली भूमिका शक्य तों कोणत्याहि वादांत न पडतां सांगण्याचें ठरविलें आहे.

## रसाळ काव्य

ज्ञानेश्वरी हें श्रीमद्भगवद्गीतेवरील भाष्य असल्यामुळें तिच्या स्वतंत्र योग्यतेविषयीं अनेकांना शंका उत्पन्न होते. परंतु ज्ञानेश्वरी संपूर्णपणें वाचल्यानंतर तिची योग्यता पटल्यावांचून राहत नाहीं. श्रीमद्भगवद्गीतेवर आजपर्यंत निरनिराळ्या भाषांतून हजारों भाष्यें झालीं आहेत. जरी श्रीमद्भगवद्गीता एकच असली तरी ह्या प्रत्येक भाष्यांत त्या त्या भाष्यकाराच्या व्यक्तिमत्त्वाचे ठसे उमटल्यावांचून राहिले नाहींत. ज्ञानेश्वर हे जन्मजातच कवि होते. आणि त्यांची भूमिकाहि कवीचीच आहे. निरनिराळ्या अध्यायांच्या प्रस्तावनांतून आणि उपसंहारांतून ज्ञानेश्वरांनीं आपली ही भूमिका स्पष्टपणें मांडली आहे.

रसिकाच्या भूमिकेंतूनच श्रोत्यांनीं ज्ञानेश्वरीकडे पाहावें असें त्यांनीं प्रारंभींच सुचविलें आहे. शरदृतूंतील चन्द्रकलेमधले अमृतकण चकोरशावक ज्या हळुवारपणानें वेंचून घेतात तोच हळुवारपणा श्रोत्यांच्या चित्तांतहि असला पाहिजे. ज्ञानदेव म्हणतात—

'शारदीचिये चन्द्रकळे। माजि अमृतकण कोंवळे।
ते वेंचिती मनें मवाळें। चकोरतलगें
तियापरीं श्रोतां। अनुभवावी हे कथा।
अति हळुवारपण चित्ता। आणूनियां॥'

—अ० १—५६, ५७.

अशा हळुवार चित्तानें श्रोत्यांनीं ह्या कथेचा अनुभव घ्यावा. कारण, ह्यांतील प्रतिपाद्य विषय असा आहे :

'हें शब्देंवीण संवादिजे। इंद्रिया नेणतां भोगिजें।
बोलाआदि झोंबिजे। प्रमेयासी॥
जैसे भ्रमर पराग नेती। परी कमळदळें नेणती।
तैसी परी आहे सेविती। ग्रंथीं इये॥'

—अ० १—५८, ५९.

अशा रसिकपणानें जर ज्ञानेश्वरीचा अनुभव घेतला तर काव्याचें मौलिभूत प्रयोजन जो रसास्वादसमुद्भूत आनन्द तो प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाहीं असें ज्ञानेश्वरांचें प्रतिज्ञेवर सांगणें आहे.

'तरी अवधान येकलें दीजे।
मग सर्व सुखांसि पात्र होइजे।
हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड आइका॥'—अ० ९—१.

रसास्वादामुळें मिळणाऱ्या ह्या आनन्दाचें अतीन्द्रियत्व सहाव्या अध्यायामध्यें ज्ञानेश्वरांनीं सुन्दर रीतीनें वर्णिलें आहे. शब्द हा वास्तविक श्रवणेन्द्रियाचा विषय असला तरी त्याच्या गोडीमुळें सर्व इन्द्रियांत कळंभा (कलह) उत्पन्न होईल (अ० ६, ११ ते २२). ह्या रसाळ अक्षरांची गोडी ज्ञानदेव वर्णन करतात. :

'माझा मऱ्हाटाचि बोलु कौतुकें।
परी अमृतातें पैजा जिंके।
ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन॥' अ० ६, १४॥

आपल्या भाष्याची विशेषता सांगतांना ज्ञानेश्वरांनीं



अनुक्रमणिका





पुनः पुनः आवर्जून सांगितलें आहे कीं हें भाष्य एक रसाळ काव्य आहे. आपल्या ग्रंथांतील रसोत्कर्षाचे उल्लेख त्यांनीं ठिकठिकाणीं केले आहेत. त्यांच्या अध्यायांच्या प्रस्तावनांतून आणि उपसंहारांतून हे उल्लेख वारंवार आलेले आढळतात. ज्ञानेश्वरींतील प्रधान रस ' शांत ' हाच आहे. पण तो शृंगाराच्याहि ' माथां पाय ' ठेवील असें ज्ञानदेवांचें म्हणणें आहे. इतरहि सर्व रसांचा ज्ञानेश्वरांनीं योग्य तो परिपोष केला आहेच :

' जेथ शांताचिया घरा । अद्‌भुत आला आहे पाहुणेरा।
आणि येरांही रसां पांतिकरां । जाहला मान ॥ '

— अ० ११–२

बाराव्या अध्यायांतहि ज्ञानेश्वर म्हणतात —

' नवरसीं भरवी सागर । करवी उचित रत्नांचे आगर।
भावार्थाचे गिरिवर । निफजवी माये ॥'--अ० १२–११.

अर्थात् ज्ञानेश्वरी हें अभिजात काव्य आहे ह्याविषयीं मुळींच शंका राहूं नये. सहाव्या अध्यायांतहि आपल्या टीकेंत मूळ विषयाला साहित्यामुळें बरवेपण प्राप्त झालें आह असें ज्ञानेश्वर सांगतात. असे हे उल्लेख ज्ञानेश्वरींत सर्वत्रच आढळतात.

## सजीव व्यक्तिचित्रें

कोणत्याहि श्रेष्ठ काव्याप्रमाणेंच ज्ञानेश्वरीहि उत्स्फूर्त असली तरी उत्स्फूर्त काव्यामध्येंहि कवीच्या व्यक्तिमत्त्वाचें ठसे सहजच उमटत असतात. ज्ञानेश्वरांना, अगदीं सामान्यांतील सामान्य माणसास सुद्धां गीतार्थ समजेल, अशा रीतीनेंच गीतेचें विवरण करावयाचें होतें. गीतेची जनमनावरील विलक्षण पकड ज्ञानदेवांनीं बरोबर हेरली होती. ज्ञानेश्वरांनीं आपला अभिप्राय व्यक्त करण्यासाठीं गीतेचीच निवड केली ह्याला हेंहि एक कारण होतें. ज्ञानदेव म्हणतात–

' यऱ्हवीं तरी साचोकारें । तुम्ही गीतार्थाचे सोयरे ।
जाणोनि गीता जीवसरें । धरिली मिया ॥ '

— अ० १३–३३०

' खरं सांगायचं म्हणजे तुम्ही गीतार्थाचे सोयरे आहांत म्हणूनच मीं गीता जिवाशीं धरिली. ' त्याचप्रमाणें गीतेमध्यें तत्त्वज्ञानाच्या जोडीला काव्याचाहि परिपोष करतां येईल अशी स्थिति ज्ञानदेवांना आढळली. गीता हा जरी तत्त्वज्ञानावरील ग्रंथ असला तरी हें तत्त्वज्ञान भारतीय युद्धाच्या पार्श्वभूमीवर कृष्णार्जुनांच्या संवादाद्वारें सांगितलें असल्यामुळें ज्ञानेश्वरांना रसपरिपोष करणें शक्य झालें. गीतेवर भाष्य करतांना केवळ गीतेच्या श्लोकांतील तत्त्वज्ञानच स्पष्ट न करतां ज्ञानदेवांनीं संजयधृतराष्ट्र व कृष्णार्जुन ह्या गीतेंतील पात्रांचीं सजीव व्यक्तिचित्रें त्यांचें सूक्ष्म मनोविश्लेषण करून हुबेहूब रेखाटलीं आहेत.

आपलें हें काव्य मराठी भाषेंतूनच व्यक्त करण्याचा ज्ञानेश्वरांचा आग्रह आहे. मराठी भाषेमुळें कवित्वाला थोडीसुद्धां उणीव येईल असें त्यांना वाटत नाहीं. उलट, मराठी ही सामान्य जनतेची भाषा असल्यामुळें तिच्यातून ग्रंथरचना केल्यामुळें सर्वांनाच गीतार्थ सहज प्राप्त होऊं शकेल असें त्यांना वाटतें. वेद केवळ उच्चवर्णीय पुरुषांकरितांच असल्याकारणानें सामान्य जनांसाठीं वेदाचें सारें तात्पर्य सांगणारी गीता त्यांच्या भाषेंत येणें अवश्य होतें. म्हणूनच ज्ञानदेव म्हणतात–

' ये मऱ्हाटीयेचिया नगरी । ब्रह्मविद्येचा सुकाळ करी ।
घेणें देणें सुखचिवरी । हो देईं या जगा ॥ '

अ० १२–१६

अकराव्या अध्यायांतहि ते म्हणतात—

' तीरें संस्कृताची गहनें । तोडोनि मऱ्हाटी शब्दसोपानें ।
रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥ ' अ० ११–९

गीता मराठींतून सांगतांना ते इतक्या कौशल्यानें सांगतात कीं मूळ कोणतें आणि भाष्य कोणतें हेंहि कळूं नये !

' मूळ–ग्रंथींचिया संस्कृता । वरी मऱ्हाटी नीट पाहतां ।
अभिप्राय मानलिया चित्ता । कवण भूमि हें न चोजवे ॥
जैसें आंगाचेंनि सुंदरपणें । लेणियां आंगचि होय लेणें ।
तेथे अलंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥
तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं ।
शोभती आयणी । चोखट आईका ॥ '

— अ० १० – ४३ ते ४५

म्हणूनच संस्कृताभिमानी पण्डितांच्या विरोधाला न जुमानतां ज्ञानेश्वरांनीं आपली ' भावार्थदीपिका ' मराठींतूनच सांगितली.

ज्ञानेश्वरांची ही भूमिका इतर भाष्यकारांच्या भूमिकेहून अगदीं वेगळी आहे. श्लोकांतील गहनतम



अनुक्रमणिका






तत्त्वज्ञानहि स्पष्ट करून सांगतांना ज्ञानदेव तें रसाळपणानें सांगतात. हा रसाळपणा आणण्यासाठीं ज्ञानदेवांनीं संजय-धृतराष्ट्र आणि कृष्णार्जुन ह्या गीतेमधील पात्रांचा जसा उपयोग करून घेतला आहे त्याप्रमाणेंच भाष्य लिहितांना त्यांचे गुरु आणि बन्धु निवृत्तिदेव हे जवळ बसलेले आहेत, त्यांच्यापासूनच ज्ञानदेवांना स्फूर्ति मिळत आहे, त्या स्फूर्तीमुळें त्याचें श्वासोच्छ्वासहि नित्य नवे प्रबन्ध होत आहेत आणि ते ऐकत असतां समोर बसलेले श्रोते तल्लीन होत आहेत, अशी कल्पना करून त्यांनीं स्वतः ज्ञानदेव, निवृत्तिनाथ आणि श्रोते ह्यांचीं शब्दचित्रेंहि साक्षात् उभीं केलीं आहेत. पण ह्या सर्व व्यक्तिचित्रांचा विचार स्वतंत्रपणेंच करावा लागेल.

## स्वतंत्र पद्धति

ज्ञानेश्वरांची गीतेवर भाष्य करण्याची स्वतंत्र पद्धति स्पष्ट करण्यासाठीं ह्या ठिकाणीं कांहीं श्लोकांवरील भावार्थदीपिकेचा थोडक्यांत विचार करूं. अगदीं पहिल्याच श्लोकावर टीका करतांना ' मामकाः ' ह्या एकाच शब्दावरून ज्ञानदेवांनीं पुत्रस्नेहानें मोहित झालेल्या धृतराष्ट्राची मूर्ति वाचकांच्या मानसचक्षूंसमोर साक्षात् उभी केली आहे. इतर भाष्यकारांनीं पहिल्या अध्यायामध्यें तत्त्वज्ञानाचा भाग येत नसल्यामुळें त्यावर मुळींच भाष्य लिहिलें नाहीं वा श्लोकांचा शब्दार्थच स्पष्ट करून सांगितला आहे. उलट, ज्ञानदेवांनीं मात्र ह्या अध्यायामध्यें अर्जुनाच्या गोंधळलेल्या मनःस्थितीचें विस्तारानें चित्रण केलें आहे. अर्जुन स्वाभाविकपणें धीर आणि वीर असूनहि त्याला हा मोह कसा उत्पन्न झाला ह्याचें ज्ञानेश्वरांनीं अत्यंत सुंदर स्पष्टीकरण दिलें आहे. ही करुणवृत्ति एकदम उत्पन्न झाली असें ज्ञानेश्वरांनीं सांगितलेंच नाहीं. अर्जुनाची भूमिका वीराचीच होती. त्यानें श्रीकृष्णाला दोन्हीं सैन्यांच्या मध्यें रथ उभा करावयास सांगितला तो त्याच्या मनांत कारुण्य उत्पन्न झालें म्हणून नव्हें तर कुरुसैन्यांत त्याच्याशीं लढूं शकतील अशा योग्यतेचे वीर कोण आहेत हें पाहण्यासाठींच ! ह्या दृष्टीनें ज्ञानदेवांची ' यावदेतान्निरीक्षेऽहं – ' ह्या श्लोकावरील टीका बघावी. ज्ञानदेव लिहितात--

' येथ आले असती आघवे । परी कवणेंसी म्यां झुंजावें ।
हें रणीं लागे पहावें । म्हणऊनीयां ॥
बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव ।
वांटिवावीण हांव । बांधिती झुंझी ॥
झुंझाची आवडी धरिती । परी संग्रामीं धीर नव्हती ।–'

–अ० १–१७१ ते १७३.

अशा रीतीनें प्रारंभीं अर्जुनाच्या मनांतील वीरवृत्तीचें चित्रण केल्यामुळें पुढें त्याच्या मनांत स्वजनांविषयीं उत्पन्न झालेल्या मोहाचें ज्ञानदेवांना उठावदार चित्रण करतां आलें. अगदीं सहजसुगम आणि हृदयाला भिडणारे दृष्टान्त देऊन ह्या ठिकाणीं ज्ञानदेवांनीं करुणरसाचा परिपोष केला आहे. अर्जुनाच्या मनांत करुणवृत्ति उत्पन्न झाल्यानंतर मूळची वीरवृत्ति कशी निघून गेली ह्याचें वर्णन करतांना तर ज्ञानदेवांची विशाल कल्पकता आणि सूक्ष्म निरीक्षण ह्यांनीं परमोच्च बिंदु गांठला आहे. एकामागून एक सरस दृष्टान्त पाहून सहृदय वाचक थक्क झाल्यावांचून राहात नाहीं. अर्जुनासारख्या वीराच्या मनांत हा मोह कसा उत्पन्न झाला हें ज्ञानदेव किती समर्पक दृष्टान्त देऊन स्पष्ट करतात ! —

' जैसें भ्रमर तरी भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें ।
परि कळिकेमाजि सांपडे । कोंवळिये ॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परि तें कमलदल चिरूं नेणे ।
तैसें कठिण कोंवळेपणें । स्नेह देखा ॥ '

–अ० १– २०१, २०२

आतां ज्ञानेश्वरांच्या कविमनानें ज्यांचें इतर भाष्यकारांपेक्षां अगदीं स्वतंत्र अर्थ लावले आहेत अशा दोनच श्लोकावरील टीकेचा विचार करूं. पहिल्या अध्यायाच्या अखेरीस –

' एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ '

– गी. अ. १ – ४७.

ह्या श्लोकावर भाष्य लिहितांना इतर भाष्यकारांनीं ' रथोपस्थे ' असा पदच्छेद करून उपस्थ म्हणजे मांडी असा अर्थ केला आहे. परंतु ज्ञानेश्वरांनीं मात्र रथोपस्थः असा पदच्छेद करून ' उपस्थः ' म्हणजे ' जवळ बसलेला ' असा अर्थ लावलेला दिसतो. रथांत बसलेला अर्जुन रथाच्या जवळ कसा आला हें स्पष्ट करण्यासाठीं अर्जुनानें भावनेच्या उद्रेकामुळें रथामधून खालीं उडी टाकली असें ते सांगतात :

' मग अत्यंत उद्वेगला । न धरत गहिंवर आला ।








तेथ उडी घातली खालां । रथौनियां ॥ '
असा अर्थ लावल्यामुळें स्वाभाविकपणेंच ते आपलें भाष्य अत्यंत रसाळ करूं शकले.

ह्याचप्रमाणें अकराव्या अध्यायांतील—

' कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो
लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे
येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ।

– गी. अ. ११– ३२.

ह्या श्लोकाचा अर्थ लावतांना ' ऋतेऽपि त्वाम् ' ह्याचा अर्थ ' तूं न मारलेंस तरी' असा इतर भाष्यकार लावतात. ज्ञानेश्वर मात्र ' ऋतेऽपि त्वाम् ' ह्याचा अर्थ 'तुला (पांडवांना) वगळून ' असा करतात. असा अर्थ लावण्यानें ' लोकांचा नाश करण्यासाठीं मी येथें आलों आहे ' ह्या कृष्णोक्तीनें घाबरलेल्या अर्जुनाचें, आणि त्याच्यावरील विलक्षण प्रेमामुळें त्याची समजूत घालणाऱ्या श्रीकृष्णाचें ज्ञानदेव रसाळ चित्रण करूं शकले.

गीतेमध्यें धृतराष्ट्राचा उल्लेख पहिल्या श्लोकापुरताच आहे. संजयाचे आणि अर्जुनाचे श्लोकहि कमी आहेत, पण ज्ञानेश्वरांनीं मात्र मुळांत नसतांहि ह्या तिघांचें भाषण ठिकठिकाणीं घालून त्या द्वारां त्यांचें सूक्ष्म मनोविश्लेषण केलें आहे. ज्ञानेश्वरी वाचीत असतांना,— पुत्रस्नेहानें आकळलेला म्हातारा धृतराष्ट्र आणि गीतेचा रसास्वाद चाखीत तो धृतराष्ट्रासहि चाखवूं पाहणारा संजय, कर्तव्याकर्तव्याविषयीं मोह उत्पन्न झाल्यानें योद्धयाची भूमिका सोडून शिष्यत्व स्वीकारणारा अर्जुन आणि त्याची जिज्ञासा अत्यंत कौशल्यानें आणि आपुलकीनें पूर्ण करणारा श्रीकृष्ण, योगसमाधीचा अनुभव घेत ज्ञानेश्वरांना अखण्ड स्फूर्ति पुरविणारे गुरुदेव निवृत्तिनाथ आणि त्यांच्या कृपेनें नवरसीं सागर भरविणारा बालक ज्ञानेश्वर ह्यांचीं चित्रें रसिकांच्या डोळयांपुढून केव्हांहि दूर होत नाहींत.

## ' परतत्त्वस्पर्श '

रसांखेरीज इतर काव्यगुणांनींहि ज्ञानेश्वरी नटलेली आहे. अनेक अलंकारांचा ज्ञानदेव रसांना अनुकूल उपयोग करून घेतात. रसानुकूल वर्णरचना करण्यांत तर मराठी वाङ्मयांत ज्ञानेश्वरांचा हात कोणीच धरूं शकणार नाहीं. पण केवळ एवढयानेंच काव्य श्रेष्ठ होऊं शकेल असें ज्ञानेश्वरांना वाटत नाहीं. त्यामुळें काव्य चांगलें होईल पण तें श्रेष्ठ होण्यासाठीं त्याला श्रेष्ठ तत्त्वज्ञानाची बैठक मिळाली पाहिजे. ज्ञानेश्वर म्हणतात :

' वाचीं बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व ।
रसिकत्वीं परतत्त्व- । स्पर्श जैसा ॥ '

– अ. १८-३४७

अर्थात् तत्त्वज्ञान अधिकारी व्यक्तीलाच समजूं शकेल !

' तैसें अध्यात्मशास्त्रीं यियें । अंतरंगचि अधिकारिये ।
परि लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ '

– अ. १८– १७५०.

वाक्चातुर्य प्रकट करण्यासाठीं ज्ञानेश्वर गीतार्थाला सोडून जात नाहींत. ' प्रतिपदीं गीतार्थेंसी झाडा देईन ' असें ते सांगतात. त्यांनीं विस्तार जरी पुष्कळ केला असला तरी दुधांत पाणी घालून वाढ करावी तसा तो नाहीं. गीतेनें मुळांत ध्वनित केलें तेंच ज्ञानदेवांनीं स्पष्ट करून सांगितलें. ते म्हणतात :

' तैसा जी न बडबडी । पदाची कोर न सांडी ।
मूळध्वनीचिये वाढी । निमित्त जाहलों' ॥

– अ. १३-८५४

गीतार्थाचा विस्तार करतांना ते कित्येकदां मुद्दाम सांगतात कीं हें मीं गीतेंतील पदांना अनुसरूनच सांगितलें आहे.

अशा तऱ्हेनें ज्ञानेश्वरी हें श्रेष्ठ काव्य आहे. ज्ञानेश्वरीची भूमिकाहि श्रेष्ठ काव्याचीच आहे. कोणतेंहि श्रेष्ठ काव्य हें प्रचारासाठीं लिहिलें जात नाहीं. अगदीं प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें त्यापासून प्रेरणा मात्र अनेकांना मिळूं शकेल. समकालीन समाजस्थितीचें प्रतिबिंब त्यांत अगदीं स्वाभाविकपणें पडत असतें. म्हणूनच म्लेंच्छाच्या आक्रमणापासून स्वधर्माचें रक्षण करण्यासाठींच ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी लिहिली हें म्हणणें जसें सर्वथा खरें नाहीं तसेंच ज्ञानेश्वरीमुळें ह्या कार्याला मुळींच साहाय्य झालें नाहीं असें म्हणणेंहि अयोग्यच ठरेल.

---










श्री. वामन जनार्दन कुंटे

# खादी-ग्रामोद्योग : कांहीं मूलभूत गोष्टी व सूचना

गेल्या १९५४ च्या नोव्हेंबर महिन्यांत पुण्याला खादी-ग्रामोद्योगांचें प्रदर्शन भरलें होतें. या प्रदर्शनांत इतर प्रदर्शनाप्रमाणें केवळ मांडलेल्या वस्तू नव्हत्या, तर प्रत्यक्ष क्रिया चाललेल्या होत्या हें या प्रदर्शनाचें वैशिष्टय होतें. खादी-ग्रामोद्योगांविषयीं कित्येकांच्या मनांत अनेक प्रकारच्या शंका असतात. त्या दूर होण्यास यामुळें पुष्कळ मदत झाली असावी. लक्षावधि लोक प्रदर्शन पाहून गेले. पण त्यांनीं प्रदर्शनाचें कौतुक केलें म्हणजे संपलें काय ? का यापेक्षां कांहीं विशेष अपेक्षा राखली गेली होती ? ती कोणती असावी ? हें समजण्यास खादी-ग्रामोद्योगासंबंधींचे कांहीं मूलभूत सिद्धान्त लक्षांत घेतले पाहिजेत.

## स्वातंत्र्यापूर्वीची खादी

सन १९२०-२१ पासून गांधीजींच्या प्रेरणेमुळें कॉंग्रेसनें स्वराज्याच्या चळवळींत खादीला महत्त्वाचें स्थान दिलें. त्या वेळीं खादीची उत्पत्ति आणि विक्री हें कॉंग्रेस-कमिट्यांचेंच एक मुख्य काम होतें. पण तीव्र चळवळीच्या वेळीं खादीकामांत मधूनमधून व्यत्यय येई. म्हणून १९२५ सालीं कॉंग्रेसनें ठराव करून अ. भा. चरखासंघाची स्थापना केली आणि खादीचें काम त्याच्याकडे सोपविलें. अशा रीतीनें खादीचें काम स्वतंत्र झाल्यामुळें तें झपाट्यानें वाढलें. खादींत सुधारणाहि पुष्कळ झाली. सुरवातीस खादी म्हणजे गोणपाटासारखी होती. सहा-आठ नंबरचें सूत निघत होतें. दहा नंबरचें सूत काढलें गेलें व त्याची धोतर-जोडी विणवून घेण्यांत आली. तेव्हां इतक्या बारीक सुताची तलमजोडी वापरायला जमनालालजीच योग्य, म्हणून ती त्यांना देण्यांत आली व ते ती नेसून आतां खादी किती तलम निघूं लागली आहे हें ज्याला त्याला दाखवीत फिरत होते. हें सांगितलें तर तें आतां कोणास खरें सुद्धां वाटणार नाहीं.

चरखासंघ स्वतंत्र झाला तरी राजकीय कार्यकर्ते आणि विधायक कार्यकर्ते असा त्या वेळीं विशेष भेद नव्हता. चळवळीची वेळ आली म्हणजे कांहीं साहसी विधायक कार्यकर्ते चळवळींत उडी घेत, आणि राजकीय कार्यकर्तेहि चळवळींत नसतील तेव्हां खादीचा प्रचार करीत. खादी वगैरे विधायक कार्यक्रम हा स्वराज्य मिळविण्याचा मार्ग आहे याबद्दल त्यावेळीं कॉंग्रेसमध्यें दुमत नव्हतें.

परंतु पुढें कौन्सिल-प्रवेशाचा कार्यक्रम सुरू झाल्या-वर राजकीय कार्यकर्ते आणि विधायक कार्यकर्ते असा भेद विशेष स्पष्ट होऊं लागला. त्यामुळें कॉंग्रेसमध्यें खादीच्या कामाला दुय्यम स्थान मिळूं लागलें. तेव्हां गांधीजींनीं कॉंग्रेस-सभासद-वर्गणी चार आणे होती त्याऐवजीं सूतवर्गणी चालू केली. पण त्याविरुद्ध ओरडा झाला आणि पूर्वीप्रमाणें सूतवर्गणीऐवजीं पैशांत वर्गणी घेणें सुरू करणें भाग पडलें.

गांधीजींची मात्र चरख्यावरची निष्ठा अढळ होती. वैयक्तिक सत्याग्रही निवडतांना सूत कातायला येत असल्याशिवाय ते निवड करीत नसत. पुढें १९४२ चा प्रख्यात लढा झाला. सर्व कॉंग्रेसवाले पकडले गेले. चरखासंघाचेहि अनेक कार्यकर्ते पकडले गेले व चरखा-संघाच्या कामावरहि मोठा आघात झाला.

१९४४ सालीं गांधीजी आगाखान-पॅलेसमधून सुटले. तेथें दोन वर्षांच्या अवधींत सर्व परिस्थितीवर सूक्ष्मपणें चिंतन करावयास त्यांना अवकाश मिळाला. त्यांत चरखासंघाकडून त्यांनीं जी अपेक्षा मनांत बाळ-गली होती ती सिद्ध झाली नाहीं असें त्यांना दिसून आलें. म्हणून सुटतांच सेवाग्रामला चरखासंघाच्या कार्यकर्त्यां-चें एक संमेलन बोलावलें व तेथें त्यांनीं आपलें दुःख बोलून दाखविलें. लढाईच्या काळांत सरकार चरखा दडपून टाकूं शकणार नाहीं असें गांधीजींना वाटत होतें. चरखा म्हणजे एक सूत काढायचें अवजार एवढीच त्याकडे पहायची त्यांची दृष्टि नव्हती. त्यांच्या दृष्टीनें चरखा म्हणजे अहिंसेचें व स्वावलंबनाचें प्रतीक होतें. चरखासंघाचे कांहीं कार्यकर्ते गुप्त म्हणजे पर्यायानें हिंसक चळवळींत सामील झाले आणि सरकारनें कांहीं ठिकाणीं चरखासंघावर प्रत्यक्ष आघात केला म्हणून व इतर ठिकाणीं सरकारच्या अनेक नियंत्रणामुळें खादीकामावर मोठा आघात झाला. मुख्य दोष म्हणजे खादीकार्यांतहि

केंद्रीकरण झालें होतें. मेटपल्लीसारख्या केंद्रांत खादी निर्माण होत होती आणि पुण्यासारख्या ठिकाणीं विकली जात होती. वाहतुकीच्या अनेक निर्बंधांमुळें पुण्यास खादी मिळेना आणि मेटपल्लीची विकेना. विणकरांनीं हातसूत विणायचें सोडून गिरणीचें सूत विणावयास सुरवात केली. या वेळीं खादीच वापरायची असें ज्यांचें व्रत होतें अशांची फार अडचण झाली. ही स्थिति सुधारण्याकरितां गांधीजींनीं खादीचें असें विकेंद्रीकरण सुचविलें कीं, जिल्हा हें युनिट धरून प्रत्येक जिल्ह्यानें आपल्यापुरतें खादीचें उत्पादन आपणच करावें. आणि त्यांनीं दुसरा एक मंत्र दिला: 'कातो, समझबुझकर कातो ' आणि ' काते सो पेहने और पेहने सो काते'. इतके दिवस खादी वापरली म्हणजे खादीवर आपण मोठे उपकार करीत आहों अशा ऐटीनें खादी वापरली जात होती. वरील मंत्र अमलांत आणण्याचें पहिलें पाऊल म्हणून खादीविक्रीला सुताची अट लावण्यांत आली. दोन रुपयांची खादी घ्यावयाची तर १ गुंडी सूत द्यावें लागे. हें प्रमाण पुढें वाढत जावयाचें होतें. पण एवढ्या अटीनेंहि खादीविक्रीवर फार परिणाम झाला. खादीविक्री घटूं लागली. काँग्रेसची खादीनिष्ठा कसाला लागली आणि खादी-उत्पत्ति-केंद्रें बंद करण्याची पाळी आली. आणि चरखासंघानें स्वतः जरी सुताची अट सोडली नाहीं, तरी प्रमाणित भांडारांकडून सुताशिवाय खादीविक्रीची सोय करून देणें चरखासंघाला भाग पडलें. ही पीछेहाट योग्य झाली नाहीं.

### स्वातंत्र्यानंतर

एवढ्यांत १९४७ सालीं स्वातंत्र्य मिळालें. आतां काँग्रेसमधील बऱ्याच लोकांना खादीची जरूरी वाटेनाशी झाली. पुष्कळशा खादीधाऱ्यांनीं खादी वापरणें सोडून दिलें. काँग्रेसनें खादीची अट काढून टाकली नाहीं म्हणून तेवढ्यापुरती खादी वापरण्यांत येऊं लागली. खादी जेव्हां बंडाची निशाणी होती त्या वेळीं ती घालणें धाडसाचें काम होतें. त्या वेळीं चरखासंघाशिवाय खादीचीं दुकानें कोणी काढूं इच्छींत नव्हते. पण ती आतां सरकार-दरबारीं मान्य झाल्यामुळें अनेक अप्रमाणित दुकानें निघूं लागलीं. त्यांचाहि खऱ्या खादीला धक्का बसला.–काँग्रेस-तिकिटावर निवडून आलेले एक आमदार माझ्या माहितीच्या एका शाळेला भेट द्यायला आले होते. पहिल्या तीन वर्गांत इंग्रजी बंद करून त्याऐवजीं कांहीं हस्तव्यवसाय सुरूं करण्याबद्दल सरकारी हुकूम नुकताच झाला होता. त्याप्रमाणें या शाळेंत सूतकताईचा हस्तव्यवसाय चालू होता. तो पाहून ते म्हणतात: 'इंग्रजी हें वाघिणीचें दूध होतें. या सुतांत तसें आहे काय ? ' म्हणजे सूत हें शेळीचें दूध ! स्वातंत्र्यानंतर जर चरख्याची जरूरी नाहीं तर स्वातंत्र्य मिळवायला तरी ती होती का ? कीं तें त्या इंग्रजी भाषारूपी वाघिणीच्या दुधानेंच मिळवून दिलें ? तें कांहींहि असो ! पण वरील काँग्रेस आमदारांचे उद्गार मोठे सूचक आहेत. सर्वसामान्य काँग्रेसवाल्यांचा गांधींच्या विधायक कार्यक्रमावर विश्वास नाहीं. दारूबंदी, खादी, ग्रामोद्योग यांविरुद्ध ते सररहा बोलतात. पदाधिकारी आहेत तेवढे लोक जेमतेम समारंभापुरती खादी वापरतात. पण तीहि बरीचशी अप्रमाणित दुकानांत खरीदली जाते. काँग्रेसला गांधीजींच्या नांवाची प्रतिष्ठा पाहिजे पण त्यांचे कार्यक्रम नकोत. ही गोष्ट महात्माजींनीं जाणली होती व त्यांनीं स्वराज्य मिळतांच काँग्रेस विसर्जन करण्याचा सल्ला दिला होता. कारण, मोठ्या भांडवलदारांपासून अगदं कम्युनिस्टांपर्यंत सर्व तऱ्हेचे लोक इंग्रजाविरुद्ध काँग्रेसमध्यें दाखल झाले होते. इंग्रज दूर झाल्यावर हे लोक एकत्र राहणें शक्य नव्हतें. पण तो सल्ला मानला गेला नाहीं. त्यामुळें काँग्रेसमध्यें दंभ शिरला आहे. काँग्रेसला बाहेरच्या विरोधाचें तितकेंसे भय नाहीं. पण अंतर्गत विरोधाचें भय फार मोठें आहे. स्वातंत्र्याकरितां कष्ट सोसलेलीं माणसें जसजशी कमी होत जातील तसतशी ही दुर्बलता अधिक स्पष्ट होऊं लागेल.

### खादी-ग्रामोद्योग-बोर्ड

सरकारच्या प्लॅनिंग कमिशननें केलेल्या 'प्लॅन'मध्यें मोठ्या उद्योगधंद्यांची वाढ करण्याच्या मोठमोठ्या योजना आहेत. खादी व ग्रामोद्योग यांची फक्त स्तुति आहे. त्यांचें स्थान काय व कोठें याबद्दल कमिशननें मूग गिळले आहेत. या प्लॅनवर कडाडून कोणी हल्ला चढविला असेल तर तो विनोबांनीं. त्या वेळीं प्लॅनिंग कमिशन बरोबर त्यांची तीनचार दिवस दिलखुलास चर्चा झाली. विनोबांचा सवाल असा होता कीं योजना पुरी झाली तर प्रत्येकाला काम मिळेल काय ? कमिशनचें उत्तर असें कीं उद्योगधंदे वाढले म्हणजे त्यांत अधिक लोकांना काम मिळेल आणि तितक्या प्रमाणांत बेकारी कमी होईल. पण प्रत्येकाला काम मिळेल असें आश्वा-

सन कांहीं कमिशन देऊं शकलें नाहीं. मग विनोबांनीं विचारलें: ' मग याला नॅशनल प्लॅनिंग कसें म्हणतां ? ' कमिशन म्हणालें: ' त्याला पाहिजे तर पार्शल प्लॅनिंग म्हणा. ' यावर विनोबांचें म्हणणें कीं ' मग पार्शालिटी दाखवायची ती गरीबांना दाखवा. ' कमिशनचें आणि विनोबांचें एकमत झालें नाहीं. आज प्लॅनप्रमाणें बहुतेक उद्दिष्टें ( targets ) पुरीं होत आलीं आहेत. पण बेकारी कमी होण्याऐवजीं वाढतच आहे. सदर्नरेल्वेची नोकरीकरितां जाहिरात होती. त्याकरितां ऐशी हजारांवर अर्ज आले. केंद्र-सरकारनें बेकारी कांहीं प्रमाणांत कमी करण्याकरितां १६००० प्राथमिक शिक्षक नेमण्याची एक योजना केली आहे.-कांहींअसलें तरी विनोबांच्याशीं झालेल्या चर्चेचा परिणाम खादी-ग्रामोद्योग– बोर्ड स्थापन करण्यांत झाला असावा. पण त्याला उतारा म्हणून एक हातमाग-बोर्डहि स्थापलें. जणूं कांहीं खादी-बोर्ड आपली खादी हातमागावर विणून न घेतां गिरणींतून विणून घेणार होतें ! शिवाय ही हातमागाला दिलेली मदत पर्यायानें पॉवर - लूमला पोंचणार आहे. कारण हातमागाचें कापड कोणतें आणि पॉवरलूमचें कोणतें हें कसें शोधून काढायचें ?

खादी-बोर्डानें प्राथमिक काम पुष्कळच केलें आहे. पण चरखासंघाचें जें नवसंस्करण करण्यांत आलें त्याच्याकडे खा. ग्रा. बोर्डानें तितकेंसें लक्ष दिलेलें दिसत नाहीं. खादी-बोर्ड स्थापन होण्यापूर्वी श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांनीं एक पंचवार्षिक योजना तयार केली होती. त्यांत पांच वर्षांत पाऊण कोट लोकांना कताईशिक्षण देण्याचें ठरविलें होतें. खादी-बोर्डांत बरेचसे चरखासंघांतलेच लोक आहेत तेव्हां ते ही योजना अमलांत आणतील असें वाटत होतें. पण तसें घडलें नाहीं. फक्त नाशिकला ' त्र्यंबक विद्यालय ' सुरूं केलें आहे. त्यांत अदमासें शंभर-सवाशें विद्यार्थ्यांना शिकविण्याची व्यवस्था आहे. त्याचें काम मात्र फारच आशादायी आहे. खादी-बोर्डाचें मुख्य काम खादीकामाला 'सबसिडी' देणें एवढेंच मुख्यतः सध्यां चालू आहे. खादी-उत्पत्तीला इतकी मदत, विक्रीला इतकी, विणाईला इतकी – अशा मदतीनें काय उपयोग होणार, देव जाणे ! इतकी मदत दिल्यावरहि खादी गिरणीच्या कापडाशी स्पर्धा करूं शकत नाहीं. हातमागाची धोतरजोडी ११ रुपयाला मिळते. हॅंडलूम-बोर्ड दीड आणा मदत देते म्हणजे ती जोडी १० रुपयाला पडते. खादीच्या धोतरजोडीला १८ रुपये किंमत पडते. खादी-बोर्ड रुपयाला तीन आणे मदत देते. ती कमी केली तर प्रत्यक्ष १५ रुपये पडतात. शिवाय ती इतकी जाडीभरडी असते कीं खादीच वापरण्याचा निश्चय असल्याशिवाय ती वापरली जाणार नाहीं. तलम घ्यायची म्हणजे तर ३० रुपये ४० रुपयेहि किंमत पडते ! अशी दिली जाणारी मदत पूर्णतया फुकट जात आहे. या मदतीनें खादीचें काम मूळ धरून आपल्या पायावर पुढेंमागें उभें राहील अशी कल्पनाहि करणें चुकीचें आहे. चरखा-संघानें आपलें व्यापारी काम आवरून घेतल्यावर तें काम कांहीं सहकारी सोसायटया करीत आहेत. त्यांची खादी खपत नाहीं, भांडवल अडकून पडलें आहे. तें मोकळें करण्यासाठीं खादीहुंड्या काढल्या ही गोष्ट बरी झाली नाहीं. या हुंड्यांनीं तात्पुरती सोय झाली असेल पण त्याचे अनिष्ट परिणाम थोड्याच दिवसांत नजरेस येऊं लागतील. हुंड्या खपवितांना नुसत्या भावनांवर अथवा भिडेनें खपवल्या गेल्या. आणि खादीभांडारांत मनासारखा माल मिळत नाहीं म्हणून गिऱ्हाईक नाखुष; अशी खादीची एकप्रकारें या हुंड्यामुळें बदनामीच होणार आहे ! तसेंच या हुंड्या एक प्रकारच्या नोटा आहेत इतक्या दक्षतेनें व हिशेबीपणानें वापरल्या पाहिजेत. नाहींतर त्यांत किती तरी गोंधळ झालेला आढळून येईल.

### खादी-ग्रामोद्योग व बेकारी

खादी-ग्रा. बोर्ड सध्यां जें काम करीत आहे, त्या ' चरखा हें बेकारी निवारणाचें खात्रीचें साधन आहे ' ह चरख्याचा दावा सिद्ध होईल काय ? सध्या जें काम चालू आहे तेवढ्यांतून जी उत्पत्ति होत आहे ती खपविण्याकरितां जर एवढा आटापिटा करावा लागत आहे तर सर्व बेकारांना खादीचें काम द्यायचें ठरविलें तर उत्पन्न होणारी खादी खपवितां येईल काय ?

प्रत्येक सुधारलेलें सरकार बेकारांना काम देणें हें आपलें कर्तव्य मानतें. हिंदुस्थानांतल्या लोकांना आपल्या या हक्काची अद्याप जाणीव झालेली नाहीं. म्हणून प्लॅनिंग कमिशननें उत्पादन वाढविणें एवढेंच आपलें ध्येय ठरविलें. बेकारांना काम देणें हेंच नियोजनाचें ध्येय असलें पाहिजे. पुढच्या प्लॅनमध्यें पहिल्या पांच










वर्षांच्या अखेरीस सव्वा कोटी लोकांना, आणखी दहा वर्षांच्या अखेरीस अडीच कोटी लोकांना काम मिळेल अशी अर्थमंत्र्यांनीं घोषणा केली आहे. म्हणजे बेकार दहा वर्षे जगला वांचला तर त्याला काम मिळणार ! वस्तुतः बेकाराला आजच्या आज काम पाहिजे ही गोष्ट अर्थमंत्र्यांच्या लक्षांत यावयाला पाहिजे.

खादीग्रामोद्योगांच्या साहाय्यानें आजच्या आज बेकारी मिटूं शकते. शिवाय खेड्यांतली जी बेकारी आहे ती अर्धबेकारी आहे. मोसमाच्या वेळीं शेतांत खूप काम असतें आणि सुमारें सहा महिने रिकामा वेळ असतो. अशा अर्धवट बेकाराला कायमचें दुसरीकडे काम मिळून चालत नाहीं. येथील कामगार स्थलांतर करणारे (migratory) आहेत अशी मुंबईच्या गिरणीवाल्यांची कामगारांविरुद्ध तक्रार आहेच. तेव्हां अशा बेकारांना चरखा हें अमोल साधन आहे ही गोष्ट सरकारला पटली तर हें ध्येय सहज साधतां येईल. पण या बाबतींत सरकारची अर्थ-नीति स्पष्ट झाली पाहिजे. आतांच्या मिश्र अर्थनीतीच्या नांवाखालीं तोंडी सहानुभूति ग्रामोद्योगांना आणि भरपूर मदत केंद्रित उद्योगांना अशी स्थिति आहे. ती स्पष्टपणें बदलली पाहिजे ग्रामोद्योगांना प्राधान्य आणि त्याला धक्का लागणार नसेल तेवढेंच इतर धंद्यांना साहाय्य असें धोरण पक्कें ठरलें पाहिजे.

येथें ग्रामोद्योगांसंबंधीं गांधीजींचें मत उद्धृत करणें अनाठायीं होणार नाहीं. तेंडूलकरांनीं प्रसिद्ध केलेल्या चरित्रांतून (भाग ५, पान ९-१०) यांतून पुढील प्रश्नोत्तरें अनुवाद करून दिलीं आहेत:

प्रश्न : तुम्ही मोठ्या प्रमाणाच्या उत्पत्तीच्या विरुद्ध आहांत काय ?

उत्तर : मी तसें कधींच म्हटलेलें नाहीं. मजविषयीं ज्या निराधार बेडगळ समजुती पसरविल्या जातात त्यांतली ही एक आहे. त्यांना उत्तरें देण्यांत माझा अर्धा वेळ जातो. ज्या वस्तू शेतकरी सहज बनवूं शकतात त्या वस्तूंचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याच्या मी विरुद्ध आहे.

प्रश्न : ग्रामोद्योग आणि मोठे उद्योगधंदे यांचा समन्वय करितां येईल असें तुम्हांस वाटतें काय ?

उत्तर : होय, खेड्यांना ते सहायक होतील अशी त्याची मांडणी करण्यांत आली तर त्यांचा समन्वय करितां येईल.

प्रश्न : खेड्यांचें संरक्षण म्हणजे काय ?

उत्तर : खेड्यांचें संरक्षण म्हणजे शहरांचें त्यांच्यावर आक्रमण चालू आहे त्यापासून त्यांचें रक्षण. माझ्या योजनेंत ज्या वस्तू खेडीं बनवूं शकत असतील त्या शहरांत बनविण्यास परवानगी मिळणार नाहीं. शहरांचें खरें काम म्हणजे खेड्यांत बनलेल्या वस्तूंचीं शहरें उतारपेठा व्हावींत.

प्रश्न : हातमागाशीं कापडगिरण्यांचा समन्वय करितां येणार नाहीं काय ?

उत्तर : माझें याला स्पष्ट उत्तर आहे कीं, असा समन्वय मुळींच होणार नाहीं. खेड्याला लागणारें सर्व कापड खेड्यांतच बनलें पाहिजे.

## कांहीं सूचना

गांधीजींच्या वरील मताचा पाया एकदा मान्य केला तर मग सर्व गोष्टी सुलभ होतील. मग चालू परिस्थितीमध्यें तातडतोब काय करणें जरूर आहे त्याचें थोडें दिग्दर्शन करतो :

(१) अप्रमाणित खादीभांडारें तातडतोब बंद करावीं.

(२) नवीन गिरण्या काढण्याला वा वाढविण्याला परवानगी देऊं नये व सध्याच्या गिरण्यांनाहि ३० नंबरच्या खालचें सूत काढू देऊं नये.

(३) प्रथम, सूत कातण्याचें शिक्षण देणारे उत्तम शिक्षक तयार करावे. यामुळें बेकारीनिवारणाचें संघटित प्रत्यक्ष काम सुरूं होण्यास थोडा उशीर होईल. पण तो आवश्यक आहे. खादी-बोर्ड स्थापन व्हायला ५ वर्षे लागलींच ना ?

(४) शिक्षक जसजसे तयार होतील त्याक्रमानें त्यांनीं बेकारांना प्रथम कताईचें उत्तम शिक्षण द्यायचें. उत्तम शिक्षण याचा अर्थ चरख्याची पूर्ण माहिती : पिंजाई, तुनाई, रेचाई व कताई; म्हणजे सांगूं त्या नंबरचें मजबूत समान सूत काढतां येणें. जो माणूस मन लावून काम करील त्याला एवढें शिक्षण तीन ते सहा महिन्यांत घेतां आलें पाहिजे. शिक्षक चांगला असेल तर अगदीं पहिल्या दिवशींचें देखील सूत विणतां येतें. या सुताचें जें कापड होईल तें कातणाराला खादीधारी करण्याकरितां उपयोगांत आणावयाचें आणि नंतर








आपल्याला जरूर असेल त्या नंतरचें सूत काढून घ्यायचें. या कामाला, ८ तास काम केल्यास, साधें जीवन जगण्याइतकें वेतन द्यावयाचें.

( ५ ) जें कापड तयार करायचें तें प्रथम सरकारला जें कापड लागतें तसलेंच तयार करून घ्यायचें. सरकारनें खादीशिवाय कोणताहि कपडा घ्यायचा नाहीं. सरकारला सुमारें अडीच कोटी रुपयांचें कापड लागतें. तें सर्व बोर्डानें आपल्या देखरेखीखालीं सरकारच्या नमुन्याबरहुकूम काढून द्यावयाचें. नंतरच लोकांच्या गरजांकडे पहायचें.

( ६ ) सध्यां देशांत जें खादीकाम चालूं आहे त्याला आर्थिक मदत देण्याची जरूरी नाहीं.

( ७ ) खादीची केंद्रित उत्पत्ति करण्याचें टाळावें. जिल्ह्याला लागणारी खादी जिल्ह्यांतच उत्पन्न व्हावी असें धोरण आंखावें.

( ८ ) कताई-मंडळें स्थापण्यास उत्तेजन द्यावें.

( ९ ) सर्व शाळांत बेसिक शिक्षण सुरूं करावें. या बाबतींत प्रस्तुत लेखकानें 'केसरी' ता. (५-१२-५४) च्या अंकांत कांहीं सूचना केल्या आहेत.

( १० ) सरकारी नोकरीमध्यें जी नव्यानें भरती करावयाची त्या सर्वांना आय्. ए. एस्. पासून चपराशापर्यंत प्रत्येकाला अ. भा. चरखासंघाची 'कताई-प्रवेश' म्हणून परीक्षा होती ती आवश्यक करावी. शाळाखातें, सहकारी खातें, शेतकी खातें वगैरें सारख्या खात्यांतल्या नोकरांना – जे ४० अगर ४५ वर्षांचे आंतील असतील त्यांना – अमुक एका मुदतींत 'कताइ-प्रवेश' ही परीक्षा आवश्यक करावी.

( ११ ) हॅंडलूमबोर्ड बंद करावें. हातमागांनीं हातसूत सोडून गिरणीचें सूत विणायला घेतलें त्याच दिवशीं त्यांनीं आपल्या 'डेथ वॉरंटा'वर सही केली असें श्री. कुमाराप्पांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे.

( १२ ) इतर ग्रामोद्योगांना वरील तत्त्वें योग्य तो बदल करून लावतां येतील. ग्रामोद्योग हे खादीसारखे प्रत्येक माणसानें प्रत्येक घरीं चालूं करण्यासारखे नाहींत.

( १३ ) तेलघाणे, तांदूळ सडणें, मधुमक्षिकापालन, ताडगूळ-उत्पादन, खांडसारी साखर, हातकागद, चामड्याचे उद्योग, घरगुती काड्याच्या पेट्या, ग्रामोद्योग, साबण इतक्या ग्रामोद्योगांसंबंधीं खादी-ग्रामोद्योग-बोर्डानें बरीच खटपट केली आहे. त्यांत पिठाकरितां जात्याचा म्हणजे दळणाच्या उद्योगांचीहि अवश्य भर टाकावी.

(१४) याकरितां पिठाच्या गिरण्या, तांदूळ सडण्याच्या गिरण्या, तेलाच्या गिरण्या ( अर्थात् त्यांत डाल्डासारख्या वनस्पति-तुपाच्या गिरण्या आल्याच ) बाटा-फ्लेक्स सारखे जोडे बुटांचे यांत्रिक कारखाने यांवर ताबडतोब बंदी घालावी. साखरेचे नवीन कारखाने वाढवूं नयेत.

( १५ ) ज्या वस्तूंचा कच्चा माल खेड्यांत उत्पन्न होतो व ज्याला खेड्यांतच गिऱ्हाईक आहे अशा वस्तू त्याच खेड्यांत बनविण्याची तजवीज झाली पाहिजे. त्याकरितां यांत्रिक, तांत्रिक, शैक्षणिक व कायद्याची जी कांहीं मदत लागेल ती या उद्योगांना दिली पाहिजे.

## अध्यापन ही जीवननिष्ठा

'**महाविद्यालयांतील अध्यापक व समाज**' या विषयावर झालेल्या चर्चेंत **प्रा. सौ. हेमलता आचार्य** यांनीं जो निबंध वाचला त्याचा सारांश असा:

शिक्षणाचा व्यापार बनल्यामुळें, त्याचा दर्जा खूपच कमी झाला आहे. आपल्या स्वातंत्र्य-संग्रामाच्या इतिहासांत ज्या वेळोवेळीं चळवळी झाल्या त्यांचा वारसा अजूनहि आहे. शिक्षणाची संघटना व कारभार यांवर त्याचा प्रतिकूल परिणाम झाला आहे. म्हणून शिक्षणक्षेत्रांत योग्य तो नैतिक दर्जा कसा निर्माण करायचा हाच खरा प्रश्न आहे.— शिक्षण आणि सामाजिक प्रवृत्तींचा विकास यांतील संबंध जिव्हाळ्याचा आहे. म्हणून अध्यापक व समाज यांचे संबंध सहकार्यावरच अधिष्ठित असले पाहिजेत. — पण आज परिस्थिति पहावी तों अध्यापकाची स्थिति अनुकंपनीय आहे. समाजाकडून त्याची उपेक्षा होत आहे. शिक्षणसंस्थांतून चांगले मोठे अध्यापक दिसून येत नाहींत, याचें कारण समाजाचें औदासीन्य होय. म्हणून शिक्षकांनीं उत्तम काम करावें अशी जर समाजाची अपेक्षा असेल तर शिक्षकांना योग्य त्या संधी उपलब्ध करून देणें हें समाजाचें कर्तव्य होय. शिक्षकांनीं देखील ही जाणीव ठेविली पाहिजे कीं अध्यापन हा केवळ धंदा नसून, ती एक निष्ठा आहे. व्हाइटहेडनें म्हटल्याप्रमाणें 'विद्यासाधनेचें विचारप्रधान जीवन ही एक जीवननिष्ठा आहे. ती व्यापारी सौद्याची गोष्ट नव्हे' ( "The learned and imaginative life is a way of living and not an article of commerce" ).








श्री. अरविंद पुराणिक

# श्री. नेहरू आणि हिंदी कम्युनिस्ट पक्ष

राजकीय स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीं कॉंग्रेसचें स्वरूप आजच्या कॉंग्रेसपेक्षां फार भिन्न होतें. पूर्वींची कॉंग्रेस हें देशव्यापी राजकीय आंदोलन होतें. अनेक तऱ्हेच्या विचारसरणीचे लोक त्या आंदोलनांत केवळ राजकीय ध्येयावर एकमत होते. म्हणून कुठल्याहि तऱ्हेचा नजरेस येईल असा संघर्ष न होतां ते हिरीरीनें भाग घेऊं शकत. समाजरचनेबाबत वेळोवेळीं कॉंग्रेसनें केलेले ठराव एकमतानें पास होत असत. त्यांच्यांतील गर्भित अर्थाचा उलगडा होण्यास लागणाऱ्या खोल अभ्यासाला कधींच वाव मिळाला नाहीं. हा प्रश्न स्वातंत्र्योत्तर कालांतील आहे व त्याचा विचार मागाहून केलेलाच बरा अशा तऱ्हेचें मत कॉंग्रेसमधील बहुसंख्य पुढाऱ्यांचें होतें.

परंतु ह्या ऐक्याचें स्वरूप तात्पुरतें होतें. स्वातंत्र्य मिळाल्याबरोबर कॉंग्रेसच्या आंदोलनाचें एका राजकीय पक्षांत रूपांतर झालें. राजकीय पक्षाला लागणाऱ्या वैशिष्ट्यांनीं कॉंग्रेस सजूं लागली. कॉंग्रेसला सामाजिक प्रश्नांवर विशिष्ट दृष्टिकोन तयार करणें आवश्यक झालें.

कॉंग्रेसमध्यें मूलभूत रूपांतर झालें असतांसुद्धां नेहरूंच्याकडे पहाण्याचा जनतेचा दृष्टिकोण अजून बदललेला नाहीं. नेहरू आतां एका 'पक्षाचे' पुढारी आहेत ह्याची लोकांना जाणीव होऊं लागली आहे. पण त्याचबरोबर नेहरू हे 'अखिल भारताचे' पुढारी आहेत असेंसुद्धां त्यांना प्रामाणिकपणें वाटतें. कॉंग्रेस-पक्षाच्या धोरणावर विरोधी पक्षांच्या पुढाऱ्यांनीं नेहरूंचा उल्लेख करून जर का टीका केली, तर नेहरूंच्या प्रामाणिक हेतूबाबत टीकाकार संशय घेतात असें जनतेला वाटतें. आणि तसें वाटणेंहि साहजिक आहे. आज कोठल्याहि विरोधी पक्षाजवळ नेहरूंच्या इतका प्रभावी पुढारी नाहीं. इतर पक्षांजवळ राजकीय जबाबदारी स्वीकारण्यास लागणारें प्रभावी नेतृत्व नसल्याकारणानें, नेहरूंबद्दल वाटणारी राजकीय व भावनात्मक आत्मीयता कमी करण्यास जनता तयार नाहीं. ह्याचा अर्थ जनतेला कॉंग्रेसविरोधी पक्ष वाढूं नयेत, असें वाटत असतें असा नव्हे. ह्याचा अर्थ एवढाच आहे कीं, राजकीय पक्षांचें जीवनांत काय स्थान असतें ह्याची जाणीव जनतेस फारशी झालेली नाहीं. राजकीय पक्षांचा अर्थ जोंपर्यंत जनतेस स्पष्ट कळत नाहीं तोंपर्यंत भारतांत राजकीय पक्षांची वाढ होणें कठीण आहे. हें राजकीय शिक्षण जनतेस जो पक्ष ज्या प्रमाणांत यशस्वी रीत्या देईल त्या प्रमाणांत त्या पक्षाचा विकास होण्यास मदत होईल. थोडक्यांत म्हणजे, पक्षापेक्षां एखाद्या व्यक्तीकडून नेतृत्वाची अपेक्षा करण्याची जी वृत्ति आज बळावत आहे, तिचा लोप झाला पाहिजे. ही वृत्ति नाहींशी करण्यासाठीं जनतेच्या श्रद्धास्थानास कोणत्या पद्धतीनें वळण दिलें पाहिजे ह्याचा प्रत्येक राजकीय पक्षानें विचार केला पाहिजे. नेहरूंवर एका पक्षाकडून 'हिंदुसंस्कृतीशीं द्रोह करणारे' तर दुसऱ्या पक्षाकडून 'साम्राज्यशाहीचे हस्तक' असे आरोप केले जातात. पण अशा विधानांचा जनतेला बोध होत नाहीं. असले आरोप तिला पटत नाहींत. उलट, इतर पक्षांबद्दल अविश्वासाची भावनाच तिच्या मनांत बळावत जाते. आणि नेतृत्वाकरितां व्यक्तीवर अवलंबून राहण्याची वृत्तीहि बळावत जाते. तेव्हां, जनतेच्या श्रद्धास्थानास धक्का देणें हें कार्य किती नाजूक व जोखमीचें आहे, याची जाणीव प्रत्येक पक्षाला झाली पाहिजे.

नेहरूंचें मूल्यमापन करतांना कम्युनिस्टांनीं फार चुका केल्या आहेत असें मला वाटतें. नेहरूंचें राजकीय मूल्यमापन करतांना दोन गोष्टींचा विचार करावा लागेल : (१) भारतांत शांततेनें झालेलें सत्तान्तर. (२) नेहरूंचें राजकीय धोरण.—भारताला ज्या पद्धतीचा अवलंब करून स्वातंत्र्य मिळालें, ती पद्धति जर अवलंबिली गेली नसती तर आज येथील कम्युनिस्ट चळवळींतहि आपल्या आजूबाजूला असलेल्या देशांतील







कम्युनिस्ट चळवळीचें स्वरूप निर्माण होण्याची शक्यता होती. परंतु शांततेनें झालेल्या भारतांतील सत्तांतरामुळें येथील कम्युनिस्ट चळवळीवर फार दूरगामी परिणाम झालेले आहेत. सशस्त्र क्रांतीची तात्त्विक व व्यावहारिक उपयुक्तता जनतेस फारशी वाटत नाहीं. शांततेनें सत्तांतर झालें नसतें, तर नेहरूंनीं काय धोरण स्वीकारलें असतें हें जरी निश्चितपणें सांगतां येणार नाहीं, तरी शांततेनें झालेल्या सत्तांतराची पार्श्वभूमि लक्षांत घेऊन, त्यांच्या व्यक्तिमत्त्वामुळें कम्युनिस्ट चळवळीवर होणाऱ्या परिणामांबाबत कांहीं निश्चित स्वरूपाचीं अनुमानें काढणें आज शक्य आहे. शांततेच्या मार्गानें झालेल्या सत्तांतरामुळें सशस्त्र क्रांतिवादाची धार बोथट झालेली आहे. आज सशस्त्र क्रांतीबद्दल दुर्लक्ष न करण्याइतकें औदासीन्य जनतेंत पसरलेलें आहे. ह्या राजकीय परिणामामुळें नेहरूंना त्यांच्या मनांत वसत असलेल्या पार्लमेंटरी पद्धतीबद्दल आदर व्यक्त करण्यास एक सुवर्ण-संधि प्राप्त झाली आहे. ह्या संधीचा पुरेपूर उपयोग नेहरू करून घेत आहेत ह्याबद्दल बिलकूल शंका नाहीं. नेहरूंच्या धोरणामुळें भारतांतील राजकीय व आर्थिक संस्थांना फार निराळें वळण मिळालें आहे. नेहरूंना समाजांतील वर्गविग्रहाचें तत्त्वज्ञान जरी मान्य असलें, तरी कम्युनिस्टांच्या पद्धतीप्रमाणें प्रश्न सोडविणें त्यांना पसंत नाहीं. वर्गविग्रहाचा प्रश्न सोडविण्यास पार्लमेंटरी पद्धति फार परिणामकारक माध्यम होऊं शकेल असें नेहरूंना मनापासून वाटतें. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे जनता नेहरूंच्या मताशीं सहमत आहे, असें दिसून येतें. नेहरूंच्या धोरणामुळें जनतेला सुद्धां पार्लमेंटरी पद्धतीबद्दल आदर निर्माण होऊं लागला आहे. कम्युनिस्टांनीं ह्या गोष्टीची दखल किती घेतली आहे ह्याबद्दल जबरदस्त शंका आहे.

दुसरी अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे नेहरूंना झालेलें इतिहासाचें आकलन. कम्युनिष्ट चळवळींचा त्यांना अर्थ समजतो. त्यांचें परराष्ट्रीय राजकारण ह्याची जिवंत साक्ष देत आहे. कोठल्याहि देशांतील कम्युनिस्ट चळवळीकडे केवळ लष्करी दृष्टिकोणांतून ते कधींच पहात नसतात. कॉमनवेल्थद्वारां पाश्चात्त्य देशांचें राजकीय दडपण येत असतांहि आपल्या इतिहासाच्या आकलनावर त्यांनीं गुलामगिरीची काजळी सांचूं दिली नाहीं. आजवर अत्यंत नाजूक प्रश्नांच्या बाबतींत देखील नेहरू आपलें म्हणणें कोणाचीहि भीड-मुरवत न बाळगतां स्पष्टपणें जगापुढें मांडीत आले आहेत. त्यामुळें त्यांच्या परराष्ट्रीय धोरणाचा भारतांतील कम्युनिस्ट चळवळीवर फार मूलगामी स्वरूपाचा परिणाम झाला आहे. कम्युनिस्ट पक्षाच्या व नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणांत कांहीं मूलभूत फरक आहे असें जनतेला वाटत नाहीं. नेहरू-सारखा प्रभावी नेता परराष्ट्रीय धोरणाबाबत जवळ-जवळ कम्युनिस्टांसारखी भूमिका घेत आहे तर मग राष्ट्राची अद्यापि जबाबदारी स्वीकारण्यास परिपक्व नसलेल्या कम्युनिस्ट पक्षाला मत कां द्यावें, असा प्रश्न जनतेपुढें पडणें साहाजिक आहे, त्यांच्यांत व नेहरूंच्या धोरणांत एकच फरक आहे. सोव्हिएट गटांत गेल्या-शिवाय भारताचें हित होणार नाहीं असें कम्युनिस्ट पक्षास वाटतें. हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. " कुठलाहि गट आम्हांला नको " ह्या नेहरूंच्या मताशीं कम्युनिस्टांचें हें धोरण जुळत नाहीं. नेहरू तसें म्हणतात त्या अर्थीं ते साम्राज्यवादाचे छुपे हस्तक होत असें कम्युनिस्ट समजतात. त्यांच्या मतें केवळ लोकमताच्या दडपणामुळेंच नेहरू सध्यांचें प्रगतिकारक धोरण स्वीकारीत असतात. साम्राज्यवादी राष्ट्रें नेहरूंना फार पुढें जाऊं देणार नाहींत, त्यांच्या जनतेला भारावून टाकणाऱ्या राजकारणाचें अंतरंग साम्राज्यवादाच्या अंतिम मर्यादांमुळें लवकरच उघडकीस येईल, असें कम्युनिस्टांना वाटतें.

परंतु केवळ लोकमताच्या दडपणाला भिऊनच जर नेहरू विशिष्ट राजकारण करीत आहेत असें कम्युनिस्ट म्हणत असतील तर त्यांना एक प्रश्न विचारावासा वाटतो. जर लोकमताच्या दडपणामुळें राजकीय पुढाऱ्यांना प्रगतिकारक राजकारण स्वीकारणें भाग होत असेल तर चँग-काय-शेक, न्ही, बाओदाय व तत्सम राजकीय पुढाऱ्यांनीं तसें राजकारण कां करूं नये?—ह्या प्रश्नाचें उत्तर जर ते शोधतील तर कम्युनिस्टांना असें आढळून येईल कीं, राजकारणांतील मूलभूत विचारप्रवाहांचा अंदाज घेण्यास इतिहासाचें आकलन ज्या पद्धतीनें करून घ्यावें लागतें त्या पद्धतीनें नेहरूंच्या शिवाय इतर राज्यकर्त्यांनीं तें करून घेतलेलें नाहीं. म्हणूनच ते आज नाहींसे होण्याच्या मार्गावर लागले आहेत. इतिहासाचें व्यवस्थित आकलन करून जो राजकारण करतो त्याच्या राजकारणाचा-च जीवनावर फार चांगला व कायम स्वरूपाचा परि-



अनुक्रमणिका






णाम होऊं शकतो. नेहरूंच्या राजकारणाच्या बाबतींत असें म्हणतां येईल. काळाचीं चिन्हें त्यांनीं बरोबर ओळखलीं आहेत. नेहरूंच्या ह्या वैशिष्ट्याचा कम्युनिस्ट पक्षाकडून मान राखला गेला पाहिजे. ह्याचा अर्थ नेहरूंच्या प्रगतिकारक धोरणाला मर्यादा पडणार नाहीं असा नाहीं. केव्हांना केव्हां नेहरूंना आपल्या तटस्थतेच्या धोरणाबाबत निश्चित निर्णय घ्यावा हा लागेलच. सध्यांच्या स्थितींत नेहरूंच्या प्रगतिकारक धोरणाच्या मर्यादेबाबत शंका असणें साहजिक आहे. परंतु शंका व्यक्त करतांनाहि कम्युनिस्टांनीं नेहरूंच्या राजकारणाचें मर्म व महत्त्व ओळखलेंच पाहिजे. साम्राज्यवादाचीं लष्करी अथवा अन्य बंधनें देशावर घालून घेण्याची वेळ आली तर नेहरू त्या मोहाला सहसा बळी पडणार नाहींत, ह्याबद्दल कम्युनिस्टांना विश्वास वाटला पाहिजे. तशीच वेळ जेव्हां येईल त्या वेळीं भारतांतील लोकमत जर का संघटित नसेल तर मात्र नेहरूंवर व पर्यायानें भारतावर फार मोठी राजकीय आपत्ति येईल. नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणाला जर कायम स्वरुप प्राप्त व्हावें असें त्यांना वाटत असेल तर साम्राज्यशाहीला विरोधी असलेल्या वातावरणाचा फायदा कम्युनिस्टांनीं घेतला पाहिजे. अशी जनतेची खात्री व्हावयास पाहिजे. कम्युनिस्टांचा परराष्ट्रीय राजकारणाकडे बघण्याचा दृष्टिकोन व नेहरूंचें परराष्ट्रीय राजकारण ह्यांच्यांत मूलभूत स्वरूपाची विसंगति नाहीं. कारण इतिहासाचें आकलन करून घेण्याच्या कामीं दोघेहि मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचाच अवलंब करीत असतात. ह्यापुढें दोघांच्याहि राजकीय दृष्टिकोनांत विरोधापेक्षां परस्परपूरकताच अधिक आहे, ह्या गोष्टीवर कम्युनिस्ट पक्षानें भर दिला पाहिजे व ही गोष्ट लोकांना पटवून दिली पाहिजे.

नेहरूंचें परराष्ट्रीय धोरण पुढें चालविण्यास कॉंग्रेसमध्यें त्या दर्जाचे पुढारी नाहींत. इतिहासाकडे बघण्याची नेहरूंची शास्त्रीय दृष्टि, कॉंग्रेसमधील फार थोड्या पुढाऱ्यांना आहे. ह्याचा अर्थ असा कीं, कॉंग्रेसमध्यें नेहरू व इतर पुढारी यांच्यांत महत्त्वाचें राजकीय अंतर आहे. आणि ह्यामुळेंच, नेहरूंचें राजकारण व्यक्तीपुरतेंच मर्यादित राहण्याची शक्यता आहे. ही परिस्थिति माझ्या मतें अत्यंत धोक्याची आहे. परंतु ही धोक्याची परिस्थिति नेहरूंच्या देशव्यापी लोकप्रियतेमुळें लोकांच्या नजरेआड होत असते. नेहरूंच्या पायाखालील वाळू ही घसरती आहे ही वस्तुस्थिति जनतेला दिसली पाहिजे. म्हणजेच, नेहरूंच्या राजकारणाच्या व्यक्तिगत मर्यादा जनतेला स्पष्ट होतील. कायम स्वरूपाचें नेतृत्व फक्त पक्षच करूं शकतो, एखादी व्यक्ति करूं शकत नाहीं ही गोष्ट मग जनतेला समजूं लागेल. अशा परिस्थितींत कम्युनिस्ट पक्षानें नेहरूंच्या हेतूंविषयीं अथवा त्यांच्या स्वतंत्र उपक्रमशीलतेविषयीं संशय व्यक्त न करतां जनतेला आपली भूमिका पटवून देण्याची शिकस्त करावी. प्रजासमाजवादी पक्षांतील वैचारिक गोंधळ कम्युनिस्टांच्या उपयोगी पडण्याची शक्यता आहे. गांधीवादाचीं व समाजवादाचीं प्रमेयें अत्यंत भिन्न आहेत. त्यांच्यांत कधींहि समन्वय करतां येणार नाहीं. ह्या वस्तुस्थितीचा अभ्यास तात्त्विक दृष्टिकोणांतून झाला पाहिजे. लोकांना ही गोष्ट पटवून देतां आली पाहिजे. हें करतांना, अनेक गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतील. प्रजासमाजवादी पक्षाला नुसतें हिणवून चालणार नाहीं. बऱ्याच मध्यमवर्गीयांना, प्रजासमाजवादी पक्षाचें तत्त्वज्ञान पटतें. तो गोंधळ वाटत नाहीं. तो एक नवीन प्रयोग आहे असें त्यांना वाटतें. परंतु ह्या नावीन्याचा पाया राजकीय दृष्ट्या किती दुर्बळ आहे ह्याची जाणीव त्यांना व एकंदर जनतेला झाली पाहिजे. हें कार्य इतकें मोठें व अवघड आहे कीं, कम्युनिस्टांनीं आपला ठोकळेबाज दृष्टिकोन सोडल्याशिवाय ते ह्या बाबतींत कांहीं करूं शकतील असें वाटत नाहीं. ठोकळेबाज पद्धतीनें येथून तेथून सारेच कम्युनिस्टेतर पुढारी राजकीय दृष्ट्या नादान आहेत असें म्हणण्यानें कांहींहि साधणार नाहीं. शिवाय नेतृत्व कोणत्या साधनांनीं खेंचून घ्यावयाचें हाहि प्रश्न नीट अभ्यासला पाहिजे. इतर देशांत सशस्त्र क्रांत्या होत आहेत म्हणून आपल्याकडेहि असें कांहींतरी केलेंच पाहिजे, नाहींतर हिंदी राजकारणांतील कम्युनिस्टांचें वैशिष्ट्य नाहींसें होईल, अशी कल्पना कम्युनिस्टांनीं करून घेऊं नये. क्रांतीचें स्वरूप प्रत्येक देशांत निरनिराळें असतें. तेथील जनतेच्या ऐतिहासिक, सांस्कृतिक व राजकीय अनुभवावरूनच क्रांतीचें स्वरूप ठरलें जाईल. सशस्त्र क्रांतीचें अपरिहार्यतेचें प्रमेय भारतांत खोटें ठरण्याची शक्यता आहे असें म्हणणारे लोक प्रतिगामीच आहेत असें कम्युनिस्टांनीं समजूं नये.








डॉ. मल्हार विनायक आपटे

# इच्छाशक्ति आणि जीवशास्त्र

'नवभारता'च्या जानेवारी १९५५ च्या अंकांत श्री. सरोजिनी शारंगपाणी यांचा 'इच्छाशक्ति आणि तिचें कार्यक्षेत्र' या नांवाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत आरंभींच डार्विन आणि लामार्क या जीवशास्त्रज्ञांचे उल्लेख आहेत. या शास्त्रज्ञांचीं जीं मतें म्हणून येथें मांडलीं गेलीं आहेत तीं त्यांचीं आहेत कीं नाहीं या विषयीं मला जबरदस्त शंका आहे. दुसरी गोष्ट अशी कीं डार्विन यानें एक सिद्धान्त मांडला आणि त्याचें लामार्क यानें खंडन केलें असें जें म्हटलें आहे तें अगदींच उरफाटें आहे. लामार्क याचा म्हणून जो सिद्धान्त प्रसिद्ध आहे तो त्यानें १८०९ सालीं लोकांना सांगितला, असा इतिहास आहे. याच सालीं डार्विन याचा जन्म झाला. तेव्हां डार्विन याच्या सिद्धान्ताचें खंडन किंवा दुसरें कांहीं लामार्क यानें केलें, ही गोष्ट केवळ अशक्य आहे.

खरी गोष्ट अशी आहे कीं डार्विन आणि लामार्क हे दोघेहि जीवविज्ञानी होते. त्यांपैकीं कोणीच इच्छाशक्तीचें विवेचन केलें नाहीं. लामार्क याचें लिखाण फ्रेंच भाषेंत आहे. त्याचें साक्षात् ज्ञान मला नाहीं. पण त्याचे इंग्लिश अनुवाद आहेत. त्यांपैकीं कशांतच इच्छाशक्तीविषयीं निरूपण नाहीं. डार्विन याचा प्रमुख ग्रंथ इंग्लिश आहे. त्यांतहि याविषयीं निरूपण नाहीं. डार्विनचा हा ग्रंथ १८५९ मध्यें प्रसिद्ध झालेला आहे.

श्री. सरोजिनीबाई लिहितात कीं डार्विन यानें दैववादाला पुष्टि दिली आणि लामार्क यानें तद्विरुद्ध इच्छाशक्तीवर भर दिला. वस्तुतः डार्विन किंवा लामार्क यांपकीं कोणीच इच्छाशक्तीचा तिरस्कार किंवा पुरस्कार केला नाहीं. डार्विन आणि लामार्क या दोघांच्याहि अगोदरच्या विद्वानांचें जीवसृष्टीसंबंधीं मत असें होतें कीं, आरंभीं ईश्वरानें प्रत्येक जीवजाति स्वतंत्रपणें निर्माण केलेली असून ती तशीच पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली आहे. सृष्टिनिरीक्षणावरून लामार्क याचें मत असें बनलें कीं प्रत्येक जात निरनिराळी उत्पन्न झाली असें नाहीं. एकाच जातीच्या निरनिराळया व्यक्तींनीं निरनिराळया रीतीनें आणि निरनिराळया इयत्तेनें आपल्या शरीरावयवांचा वापर केल्यानें त्यांच्या वंशजांच्या शरीराच्या घडणींत फरक पडत गेला; त्यामुळें निरनिराळया जाती उत्पन्न झाल्या. एकाच पशुजातींतील कांहीं पशूंनीं भुईवरचें गवत खाण्याची संवय ठेवली आणि कांहीं पशूंनीं उंच झाडावरचा पाला खाण्याची संवय केली. तेव्हां पहिल्यांचे वंशज घोडे झाले आणि दुसऱ्यांचे वंशज जिराफ झाले. कांहीं पक्ष्यांनीं पाण्यांत पोहून आणि विशेष प्रसंगीं पाण्यांत बुडी मारून मासे पकडण्याची संवय केली ते हंस झाले; आणि कांहीं पक्ष्यांनीं उथळ पाण्यांत चालतां-चालतां मासे पकडण्याची संवय केली ते बक झाले.

सर्व जीवजाती एकदम उत्पन्न झाल्या नाहींत. एका जातींतून अनेक जाती उत्पन्न झाल्या हें लामार्क याचें मुख्य प्रतिपाद्य होतें. तेंच डार्विन याला मान्य होतें. लामार्क यानें त्यावेळच्या विद्यमान जातींपैकीं पुष्कळांचा अभ्यास करून त्यांच्यांतलें शारीर साम्य आणि वैषम्य यांचा विचार करून आपलें मत बनविलें आणि प्रतिपादिलें. डार्विन यानें ही गोष्ट तर केलीच पण आणखी पृथ्वीच्या कवचांत गडप झालेल्या जीवशरीरांचाहि अभ्यास केला. तेव्हां त्याला आढळलें कीं, आज जितक्या जाती पृथ्वीवर वावरत आहेत तितक्या जाती दहा हजार वर्षांपूर्वी नव्हत्या. दहा लाख वर्षांपूर्वी मुळीं माणूसच नव्हता, वानरें होतीं. दहा कोट वर्षांपूर्वी वानरहि नव्हता, उंदरासारखे पशू कदाचित् असतील; पक्षी, सरपटे प्राणी आणि मासे खचित होते. तीस कोट वर्षांपूर्वी यांपैकीं फक्त मासेच होते. त्याच्याहिपूर्वी दोनतीन कोटी वर्षें मासेहि नव्हते, त्याहून क्षुद्र जलचर मात्र होते.

पृथ्वीच्या कवचांत आढळणाऱ्या जीवजातींचें कालानुक्रमें अस्तित्व-नास्तित्व दाखविणारा पुरावा डार्विन








याला इतका निर्णायक वाटला कीं एकांतून अनेक जाती उद्भवल्या या लामार्क याच्या मतास त्यानें पूर्ण अनुमोदन दिलें. परिस्थितीमुळें संततींत फरक पडत जातो या गोष्टीसहि डार्विन याची संमति होती. मतभेद अगदीं थोडा होता. तो इतकाच कीं संततींत दैववशात् थोडथोडे भेद असतात. त्या सगळयांना परिस्थिति एकदम अनुकूल असणें संभवत नाहीं. ज्यांना अनुकूल असते ते भेद टिकतात, इतर नाहींसे होतात, असें त्यानें प्रतिपादन केलें. संततींत थोडथोडे फरक दैववशात् होतात, असें डार्विन म्हणूं लागला. लामार्क म्हणत असे, पितरांच्या वागणुकींत जो प्रयत्न असतो त्यास अनुसरून हा संततीतील फरक पडतो. पितरांची वागणूक इच्छाशक्तीनें प्रेरित होती किंवा नव्हती याविषयीं लामार्क मुग्ध होता. तात्पर्य असें कीं इच्छाशक्तीसंबंधीं विचार लामार्क आणि डार्विन यांच्या मनांत आले नव्हते. त्यांचें सारें लक्ष्य जीवजाती एकदम सगळया उत्पन्न झाल्या नाहींत, एकापासून अनेक झाल्या हें सांगण्याकडे होतें. एकांतून अनेक झाल्या असेंच दोघांनींहि प्रतिपादन केलें. विद्यमान जातींत भेद आहेत तितके पूर्वी नसतील असें अनुमान लामार्क यानें काढलें, आणि डार्विन यानें गतकालांत क्रमाक्रमानें जातींची संख्या वाढत आली आहे असा मूर्त पुरावा वाचकांपुढें व्यवस्थितपणें मांडला. एकांतून अनेक जाती कां व कशा झाल्या असा प्रश्न लगेच उपस्थित झाला आणि तो सोडविण्याकरतां दोघांनीं थोडीं भिन्न उत्तरें दिलीं. त्यांत इच्छाशक्तीचें विवेचन किंवा निरूपण नव्हतें. तथापि इच्छाशक्ति मुळींच ध्वनित होत नव्हती असें नाहीं. विशिष्ट प्रकारें जगण्याची इच्छा असण्यानें फरक पडला असा लामार्क याचा अभिप्राय, तर जगण्याची इच्छा सर्वांची असते, दैवयोगानें शरीरांत भेद असतात, असा डार्विन याचा अभिप्राय आहे.

इंद्रियविज्ञानविषयक प्रयोग करण्याची प्रथा लामार्क याच्या पूर्वी देखील होती. त्याच्यानंतर ती बरीच वाढली. स्वतः डार्विन यानें असले प्रयोग नांव घेण्याजोगे केले नाहींत. परंतु त्याच्या काळच्या इतर विज्ञात्यांनीं केले आणि त्याच्या मागूनच्या विज्ञात्यांनीं तर पुष्कळच केले. इच्छा कोणत्या इंद्रियांत उत्पन्न होते, हा महत्त्वाचा प्रश्न होता. तो अशा विज्ञात्यांनीं सोडविला. इच्छा मेंदूच्या एका विशिष्ट भागांतच उत्पन्न होते. तेथून कांहीं विशिष्ट मार्गांनीं चेतना कर्मेंद्रियांना मिळून प्राण्यांच्या ( शारीर ) क्रिया घडतात. मेंदूचा संबंध तोडला असतां कर्मेंद्रियाकडून क्रिया घडत नाहींत असें नाहीं, घडतात. त्या क्रिया इच्छातीत क्रिया होत. तथापि अशा क्रियांना 'क्रिया' हें नांव खरोखर शोभत नाहीं. त्यांना क्रिया न म्हणणेंच चांगलें. क्रिया या शब्दानें कर्तृत्व गृहीत धरलें जातें. त्याचाच तर येथें अभाव असतो. आपण अन्न गिळतों हें खरें आहे. अन्न गिळण्याची क्रिया आपण आपल्या इच्छेनें करतों. त्या क्रियेचें कर्तृत्व आपणांकडे असतें. पण गिळलेलें अन्न पचतें तें कांहीं आपल्या इच्छेनें नव्हे. पचनाची क्रिया आपण करीत नाहीं, ती आपोआप आपल्या इच्छेवांचून घडते. म्हणून ती क्रिया म्हणण्यापेक्षा तें केवळ 'वर्तन' म्हणणें चांगलें.

श्री. सरोजिनीबाईंनीं आपल्या लेखाच्या उत्तरार्धांत 'प्रतिक्षिप्त क्रिया' ही जी शब्दयोजना केली आहे ती चुकीची आहे. त्यांतील क्रिया हा शब्दच मुळीं योग्य नाहीं. पण तो जरी चालू दिला तरी त्या क्रियेला प्रतिक्षिप्त हें विशेषण लावणें चूक आहे. क्रिया प्रतिक्षिप्त नसते. त्या क्रियेची चेतना प्रतिक्षिप्त असते. इंग्रजींत जरी 'रीफ्लेक्स' हें विशेषण 'ॲक्शन' या शब्दास लावलें असलें तरी खरोखर चेतना रिफ्लेक्ट झालेली असते. क्रिया हा तिचा परिणाम असतो. इंग्रजी शब्दप्रयोगच अयोग्य आहे. त्याचें भाषांतर तर फारच चुकीचें झालें आहे. 'ॲक्शन' यास प्रतिशब्द क्रिया हा बरोबर आहे. पण मूळचा शब्दच अयोग्य आहे. 'रिफ्लेक्स' ही कल्पना आणि शब्द अगदीं बरोबर आहे. पण त्याचें भाषांतर मात्र फार चुकलेलें आहे. एरवीं 'रिफ्लेक्स'चें भाषांतर परावर्तन करतात तेंच बरोबर आहे. वर्तन म्हटल्यानंतर पुनः क्रिया म्हणावयास नकोच. परावर्तन म्हणजे उलटून येणें. येथें चेतनेचें उलटून येणें, त्यामुळें वर्तन घडणें, करणें नव्हे – असें सहजच गृहीत धरतां येतें.

मेंदूला जोडलेला जो दोर पाठकण्यामध्यें ओवलेला आहे तो जणूं आरसा अशी कल्पना आहे. आरशावर किरण यावा आणि परतावा त्याप्रमाणें भोंवताल...












इंद्रियांतून चेतना येते आणि या दोरांतूनच परतते, वर मेंदूत जात नाहीं, किंवा जाण्याची अपेक्षा नसते – असा अभिप्राय आहे. पायाला मुंगी चावली म्हणजे दोरांतल्या हाताच्या चेतनामार्गांतून चेतना हातांत परतते, वर मेंदूंत जाण्याची अपेक्षा नसते. आपल्या नकळत झोपेंत सुद्धां हात पायाकडे जातो. हें परावर्तन होय. आरशावरून परतलेल्या किरणांनीं प्रतिबिंब दिसतें आरशामागें, पण तेथें मुळींच नसतें. पुढच्या बिंबावरून निघालेले किरण आरशामागें न जातां परत येतात, त्यामुळें प्रतिबिंब दिसतें. तसेंच येथें घडतें. पायांतून निघणारी चेतना मेंदूत न पोंचतां कण्यांतल्या दोरांतूनच हातांत परतते. हात हलविण्याची इच्छा उत्पन्न न होतांच हात पायाकडे जातो. हें चेतनेचें परावर्तन होय. यासच नुसतें परावर्तन म्हटलें तरीहि चालेल. ती क्रिया म्हणणें गौण आहे, आणि प्रतिक्षिप्त म्हणणें तर चुकीचें आहे. ही चूक श्री. सरोजिनीबाईंनीं प्रथम केली आहे असें नाहीं. पूर्व लेखकांनींहि केली आहे, हें मी जाणून आहे. मी दोष कोणासच देत नाहीं, सुधारणेची सूचना मात्र आग्रहानें सर्वांस करतों.

---

## ग्रंथ – परिचय

## ‘जपानी आधिपत्याखालील ब्रह्मदेश’

दुसरें जागतिक महायुद्ध सुरूं झालें त्यावेळीं भारतांत या युद्धाविषयीं तीन प्रकारचे विचारप्रवाह होते: “युद्धहेतूविषयीं आम्हांला खात्री वाटण्यासाठीं अगोदर भारताचें स्वातंत्र्य जाहीर करा म्हणजे मग या युद्धांत आम्हीं तुमच्या बाजूनें लढूं. फॅसिस्टांशीं आमचें शत्रुत्वच आहे. तरीपण भारताला स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज आम्हीं त्यांच्याशीं योग्य तऱ्हेनें लढूं शकणार नाहीं” असें कॉंग्रेसचें म्हणणें होतें. कम्युनिस्ट, रॉयिस्ट वगैरे मंडळी ब्रिटिशांना बिनाशर्त सहकार्य करीत होती. सुभाषचन्द्र बोस यांच्या नेतृत्वाखालील कॉंग्रेसमधील एक गट जर्मनी-जपान यांच्याकडून लष्करी मदत मिळवून भारत स्वतंत्र करतां येईल अशा मताचा होता.

सुभाषचन्द्र बोस त्यानंतर गुप्त होऊन जर्मनीमार्गें जपानला गेले व त्यांनीं आझाद-हिंद-सरकार व आझाद-हिंद-सेना स्थापन केली. आपल्या शत्रूचा जो शत्रु तो आपला मित्र या चाणक्यनीतीनें त्यांनीं जपानची मदत घेण्याचें ठरविलें होतें. गांधी, नेहरू मात्र या विचाराविरुद्ध होते. ब्रिटिश काय किंवा जपानी काय दोघेहि साम्राज्यवादी, तेव्हां भारत स्वतंत्र करण्यास जपान मदत करणें शक्य नाहीं. उलट, जपानच्या मदतीनें ब्रिटिशांना हांकून दिल्यास ब्रिटिशांच्यापेक्षांहि अतिशय अमानुष अशा गुलामगिरींत आपणास खितपत पडावें लागेल असें त्यांना वाटत होतें.

जपानी सैन्यें इंफाल-मणिपूरपर्यंतच आलीं व पुढें त्यांना माघार घ्यावी लागली. त्यामुळें ब्रिटिशांपासून भारत जिंकल्यानंतर सुभाषचन्द्रांच्या म्हणण्याप्रमाणें जपान्यांनीं भारताला स्वातंत्र्य दिलें असतें कीं नाहीं याचा आपणाला प्रत्यक्ष पडताळा पाहतां आला नाहीं. आपल्या शेजारच्या ब्रह्मदेशाला मात्र हा अनुभव आला. त्याहि देशांत आपल्यासारखेच तीन विचारप्रवाह होते. ब्रह्मदेशाला १९४२ च्या फेब्रुआरीपासून १९५४ च्या ऑगस्टपर्यंत जपानी साम्राज्याचा चांगला नमुना पाहावयास मिळाला.

युद्ध सुरूं होण्याच्या अगोदर तेथील थाकिन पक्षानें भारतांतील कॉंग्रेस-पक्षाप्रमाणें, सिन्येथा पार्टीनें डॉ. बा मॉ यांच्या नेतृत्वाखालीं सुभाषचन्द्रांप्रमाणें व कम्युनिस्ट पक्षानें इतर कम्युनिस्ट पक्षांसारखी भूमिका घेतली होती. डॉ. बा मॉ यांचा जपानवर अतिशय विश्वास होता. जपानी सैन्यें येतील तीं ब्रह्मदेश जिंकण्याकरितां नव्हे तर मुक्त करण्यासाठीं अशी त्यांची खात्री होती. सामान्य जनतेंतहि अशा प्रकारच्या विचारांचें प्राबल्य होतें. पण ब्रह्मी जनतेचा जपाननें कसा विश्वासघात केला याचें अतिशय मनोवेधक वर्णन ब्रम्हदेशाचे सध्याचे पंतप्रधान व परराष्ट्रमंत्री थाकिन नू यांच्या ‘जपानी आधिपत्याखालील

ब्रह्मदेश[1] ' या पुस्तकांत आपणास वाचावयास मिळेल. आपल्या जवाहरलालजींच्या प्रमाणें यू नू हे मोठे साहित्यिक आहेत. कित्येक वेळां त्यांनीं साहित्य-सेवेसाठीं राजकारणसंन्यास घेण्याचीहि तयारी केली होती. ब्रम्ही भाषेंत हें पुस्तक १९४५ मध्येंच प्रसिद्ध झालें. आपल्या देशबांधवांना त्यावेळचे प्रसंग अत्यंत प्रामाणिकपणानें व अनौपचारिक भाषेंत त्यांनीं सांगितले ओहत. " माझे देशबांधव जर युद्धापासून दूर झाले, युद्धाचा तिटकारा करूं लागले तर या पुस्तकाचें सार्थक झालें " असें त्यांनीं प्रस्तावनेंत म्हटलें आहे. त्यांच्या भाषेंत सांगावयाचें तर ' Beware of Pied Pipers ! ' हें या पुस्तकाचें तात्पर्य !

श्री. थाकिन नूंच्या या पुस्तकांतील (–थाकिन हे पक्षाचें नांव – सध्यां ते यू नू म्हणून ओळखले जातात. यू म्हणजे काका, सर्वसाधारणपणें मोठया माणसास काका म्हणण्याची ब्रम्हदेशांत पद्धत आहे. -- ) वर्णन १९४२ च्या फेब्रुआरींत सुरूं होतें व जपानी शरणागतीबरोबर ऑगस्ट १९४५ मध्यें संपतें.

१९४२ च्या फेब्रुआरींत जपानी विमानें जेव्हां ब्रह्मदेशावर येऊं लागलीं होतीं त्यावेळीं थाकिन नू वगैरे सर्व राजकीय पुढारी मंडालेच्या लोकमान्य-टिळक-प्रसिद्ध तुरुंगांत होते. पंधराशें गुन्हेगार राहण्याच्या जागेंत तीन-चार हजार गुन्हेगार व दोनशें राजकीय कैदी डांबून ठेवले होते. जेलमध्यें कॉलऱ्याची सांथ पसरली होती आणि वर आकाशांत जपानी बॉंबफेकीं विमानें घोंघावत होतीं. जेलवर विमानें दिसूं लागतांच थाकिन नू व एकदोघेजण सोडून बाकी सर्वांनीं आनंदानें नाचावयास व टोप्या, शर्ट वगैरें उंच उडवून त्या विमानांचें लक्ष वेधावयास सुरुवात केली. " असें केल्यास तीं विमानें अचूक बॉंब टाकतील तेव्हां तुम्हीं तसें करूं नका " असें थाकिन नूनें खूप सांगितलें पण कोणी ऐकेना. " जपानी विमानें आपल्याला स्वतंत्र करावयास आलीं आहेत ती बॉंब कशी टाकतील ? " असा त्यांनाच इतरांनीं प्रश्न विचारला. थोडयाच वेळांत अविरत बॉंबवर्षावामुळें सबंध मंडाले शहर इतकें पेटलें कीं त्या धुरामुळें सबंध जेलमध्यें भर दुपारीं अंधार पडला. तेव्हां कुठें इतरांना थाकिन नूचें म्हणणें थोडें थोडें पटूं लागलें !

मंडालेहून माघार घेतांना ब्रिटिशांनीं या तुरुंगांतील सर्व गुन्हेगारांना सोडून दिलें. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांपैकीं फक्त एक चीफ जेलर सोडून बाकी सर्व पळून गेले. आंतील राजकीय कैद्यांना पांच दिवसांचें रेशन देऊन बाहेरून कुलुपें लावून त्यानेंहि निघून जावें असें ठरलें होतें. थाकिन नूंनीं व इतरांनीं त्याला पांच हजार रुपये लांच सुटल्यानंतर देण्याचें कबूल केलें व सर्वांची सुटका करून घेतली. (–ते पैसे त्याला अद्याप देतां आले नाहींत याची यू नूंना अजून चुटपूट लागली आहे !–) त्या जेलरनें या लोकांना सोडण्याबद्दल त्यांच्याकडून स्वतःचें सामान मोटारींत भरण्याचें हमालाचें काम करून घेतलें.

जेलमधून सुटल्यानंतर कोणी काय करावयाचें याचा विचारविनिमय सुरूं झाला. एकदोघा पुढाऱ्यांनीं चीनमधून लढा चालवावा, एकदोघांनीं हिंदुस्थानांत जावें व इतरांनीं ब्रह्मदेशांतच राहावें असें ठरलें. थाकिन नूंनीं ' ब्रह्मदेशामध्येंच मला जास्त चांगलें काम करतां येईल ' असें सांगून बाहेर जाण्याचें नाकारलें. ' वास्तविक देशभक्तीपेक्षां घरची ओढ जास्त होती व पत्नी-मुलें भेटून खूप दिवस झाले होते म्हणून मी हा निर्णय घेतला ' असें त्यांनीं स्पष्टपणें लिहिलें आहे.

१९४२ च्या मे ते जुलैपर्यंत ब्रह्मदेशावर जपानी लष्कराचें राज्य होतें. अजूनहि कांहीं लोकांचा भ्रम दूर झाला नव्हता. एखाद्या खेडेगांवांत जपानी तुकडी गेली तर लोक त्यांच्या स्वागतासाठीं कमानी उभारीत, अन्नाची सोय करून ठेवीत. जपानी सैनिक तें सर्व अन्न खात असत व गांवांतील सर्वांना यथास्थित चोप देत असत. बायकांची अब्रू लुटत असत.

जुलैमध्यें डॉ. बा मॉच्या नेतृत्वाखालीं सरकार स्थापन करण्यासाठीं एक समिति नेमण्यांत आली. बा मॉचा नूंवर अतिशय विश्वास होता; म्हणून या समितीवर नूंना घेण्याचें बा मॉनें ठरविलें होतें. नूंनीं नकार दिला. कारण, त्यांना साहित्यसेवा करावयाची होती. जेलमधल्या दीड वर्षांच्या कालावधींत त्यांनीं पांच नाटकें व दोन कादंबऱ्या लिहिल्या होत्या त्यांत भर टाकण्याचा त्यांचा विचार होता. बा मॉनें अतिशय आग्रह केला व

1 ' Burma under Japanese ' by Thakin Nu ( MacMillan & Co. New york, 1954, Price Rs. 7–13–0 Pages 27+130. )

सरकार स्थापन झाल्यावर नूंचें नांव वगळण्यांत येईल या अटीवर नूंनीं समितीवर काम करण्यास संमति दिली. समितीचा सभासद असतांना अनेक लोक नूंकडे तक्रारनिवारणार्थ येत असत. नूंना कांहींहि करतां येत नसे याची त्यांना इतकी लाज वाटूं लागली की ते ऑफिसांत जातांयेतांना पुढच्या दारानें न जातां हळूंच मागच्या दाराचा उपयोग करीत.

१ ऑगस्ट १९४२ ला जपानी आधिपत्याखालील बा मॉचें सरकार स्थापन झालें. जपानी साम्राज्यशाहीनें आपणांस फसविलें असें आतां लोकांच्या हळूंहळूं ध्यानांत येऊं लागलें. डॉ. बा मॉलाहि हें समजलें. पण आतां उपाय नव्हता. आपण सर्वजण एकत्रित एकजुटीनें राहिलों तरच आपणांस ब्रह्मदेश वांचवितां येईल अशी बा मॉनें सर्वांना विनंति केली. जवळजवळ सर्व राजकीय पक्षांनीं सरकारमध्यें व सरकारबाहेरील भूमिगत चळवळीमध्यें एकजूट केली. थाकिन नूंना त्यामुळें सरकारमध्यें रहावें लागलें. सरकारी ध्वज कोणत्या रंगाचा असावा – पिवळा कीं तीनरंगी, राष्ट्रीय चिन्ह कोणतें असावें—मोर कीं उगवता सूर्य, या विषयांवर मंत्रिमंडळांत खूप चर्चा झाली. शेवटीं एकमत झाल्यावर जपानी अधिकाऱ्यांकडून परवानगी आणण्यासाठीं बा मॉ गेला. जपानी सेनापतीनें त्याला स्पष्टपणें बजाविलें कीं 'असला 'राष्ट्रवादी मूर्खपणा' मी चालूं देणार नाहीं !"

१९४३ च्या मे, जून, जुलै या महिन्यांत सरकारनें तथाकथित स्वातंत्र्याची पूर्वतयारी केली. जपान्यांना बा मॉ आतां डोईजड होऊं लागला होता. त्यामुळें बा मॉच्या मंत्रिमंडळांत भेद पाडून त्याची शक्ति कमी करण्याचें त्यांनीं ठरविलें. मुख्यप्रधानपदासाठीं त्यांनीं थाकिन नूंना गळ घातली. पण नूंनीं स्पष्ट नकार दिला. बा मॉ जपानविरोधी आहे असा प्रचार सुरूं झाला. कारण ब्रह्मी शाळांमधून सक्तीची भाषा म्हणून जपानी सुरूं करण्यास त्यानें परवानगी दिली नाहीं व इंग्रजीच कायम ठेवली. दुसरी एक गोष्ट त्याच्याविरुद्ध म्हणून स्थानिक सेनापतीनें कळविली होती. त्याचें म्हणणें असें होतें कीं बा मॉच्या दिवाणखान्यांत इंग्लंडच्या राजाचें सर्टिफिकेट आहे. वास्तविक तें सर्टिफिकेट नव्हतें. बा मॉ इंग्लंडला राज्याभिषेकसमारंभासाठीं गेला होता त्या वेळीं लंडनच्या मेयरनें त्याला खाना दिला होता. त्या वेळच्या समारंभाची आमंत्रणपत्रिका बा मॉनें फ्रेम करून दिवाणखान्यांत लावली होती. परन्तु जपान्यांच्या हेकेखोरपणामुळें ती फ्रेम त्याला काढून टाकावी लागली.

स्वातंत्र्यसमितींत थाकिन नूंचें नांव बा मॉनें घातलें. ही समिति स्थापन झाल्यावर एका आठवड्यानें जपानी सरसेनापति कवाबीचें समितीच्या सभासदांना 'चर्चा' करण्याकरितां बोलावणें आलें. समितीच्या सभासदांचा एक शब्दसुद्धां ऐकून न घेतां त्यानें अर्धा तासभर सर्व सभासदांची यथेच्छ निंदा केली व शवटीं 'चालते व्हा' म्हणून फर्माविलें. बा मॉ, थाकिन नू वगैरे सर्व पुढारी अतिशय अपमानित होऊन परत आले.

जपानी पंतप्रधान टोजोनें बा मॉला सिंगापूरला कांहीं सूचना देण्यासाठीं बोलावलें होतें. तेथें जाण्यापूर्वी स्थानिक लष्करी सेनापतीची परवानगी घेणें आवश्यक होतें. त्यासाठीं ब्रह्मदेशाच्या मुख्यप्रधानाला सेनापतीच्या बंगल्याच्या दाराशीं रस्त्यावर पाऊण तास उभें राहावें लागलें !

टोजो येणार म्हणून सर्व बडे लोक सिंगापूरच्या विमानतळावर जमले होते. टोजो विमानांतून उतरल्याबरोबर तडक शहरांत चालते झाले. त्यांच्या मागोमाग जाण्यासाठीं सगळे आपापल्या मोटारींत जाऊन बसले. बा मॉ, थाकिन नू, रासबिहारी बोस वगैरे मंडळी मोटारींत जाऊन बसली तरी मिरवणूक सुरू होइना. कारण सर्वांत पुढें मोटार असलेल्या एका जपानी अधिकाऱ्याला सिगारेट ओढण्याची इच्छा झाली. पांच मिनिटें त्यानें या सर्व बड्या मंडळींच्या मोटारी थांबवून ठेवल्या.

१ ऑगस्ट १९४३ ला ब्रम्हदेशाला स्वातंत्र्य मिळालें. जपानी सत्तेखालील तें स्वातंत्र्य म्हणजे बेगडी स्वातंत्र्यच होतें ! थाकिन नू परराष्ट्रमंत्री झाले. एकदां पत्रकारपरिषदेंत ते बर्मी भाषेंत बोलले याबद्दल एका साध्या जपानी बातमीदारानें त्यांचा अपमान केला. पुढें त्याला क्षमा मागावी लागली. पण एक सामान्य बातमीदार परराष्ट्रमंत्र्याचा अपमान करूं शकत होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

याच वेळीं ब्रिटिशांनीं चढाईला सुरुवात केली होती. रंगूनवर बॉंबफेक होत असे. भोंगा झाल्याबरोबर सर्व नागरिकांनीं तळघरांत जावें असा हुकुम होता व त्या हुकुमाची अंमलबजावणी करण्याचें काम कांहीं जपानी

व ब्रह्मी पोलिसांना दिलें होतें. एके दिवशीं भोंगा झाला तरी एक जपानी माणूस रस्त्यावरून निघून जाईना. त्याला ब्रम्ही शिपायानें हटकलें तर उलट तो त्या ब्रह्मी शिपायावर धांवून गेला. ब्रह्मी शिपायाजवळच्या रायफलच्या संगिनीनें त्याला लहानशी जखम झाली. वास्तविक यांत ब्रह्मी शिपायांची कांहींच चूक नव्हती. पण या प्रकाराबद्दल ब्रह्मदेशाच्या परराष्ट्रमंत्र्याला व संरक्षण-मंत्र्याला जपानी वकिलाची क्षमा मागावी लागली. कोणीहि साधा जपानी अधिकारी रस्त्यानें जाणार असला तरी रहदारी बंद करण्यांत येत असे. एकदां थाकिन नू आपल्या परराष्ट्रखात्याच्या कचेरींत चालले होते. त्यांनासुद्धां रस्त्यांत अर्धा तास उभें रहावें लागलें.

जपानी अधिकाऱ्यांनीं बा मॉबर मारेकरी घातले. खुनाचा कट फसला व दोघेहि मारेकरी सांपडले. पण जपानी अधिकाऱ्यांच्या विरोधामुळें त्यांना पकडतांहि येईना आणि खटलाहि भरतां येईना.

बा मॉच्या मुलीच्या लग्नप्रसंगाची दिलेली हकीगत फारच उद्बोधक आहे. यजमानाच्या उजव्या बाजूच्या पहिल्या खुर्चीवर कोणी बसावें याबद्दल वाद झाला. कारण तें स्थान समारंभांत सर्वांत मानाचें. बा मॉच्या मनांत त्या खुर्चीवर सुभाषचन्द्रांना बसवावें असें होतें. जपानी वकील म्हणाला कीं 'मी सुभाषचन्द्र वगैरे कांहीं जाणत नाहीं; मीच तेथें बसणार' त्याला खूप समजावून सांगितलें कीं 'सुभाषचन्द्र हे आझाद हिंद सरकारचे प्रमुख आहेत व तुम्ही जपानी सरकारचे वकील आहांत.' पण तो ऐकेना. शेवटीं त्याला फसवून सुभाषचन्द्रांना ती खुर्ची देण्यांत आली. वरील प्रसंगावरून सुभाषचन्द्रांना तेथें कशी वागणूक मिळत असेल याची थोडी कल्पना येते.

थाकिन नूंना परराष्ट्रमंत्री म्हणून तारा पाठविणें व आलेल्या तारांचा स्वीकार करणें, पाहुण्यांच्या स्वागता-साठीं किंवा त्यांना निरोप देण्यासाठीं विमानतळावर जाणें याशिवाय कांहीं काम नव्हतें. म्हणून त्यांनीं मग माहितीखात्याचें मंत्रिपद स्वीकारलें. तेथेंहि त्यांना अतिशय अपमानकारक वागणूक मिळाली.

असे अपमान रोज या मंत्र्यांना अनुभवावे लागत होते तेव्हां सामान्य जनतेचें काय होत असेल याची कल्पनाच न करणें बरें! जपान आशियाला मुक्त करणार आहे हा ब्रम्ही जनतेचा भ्रम आतां पूर्णपणें नाहींसा झाला होता.

२३ एप्रिल १९४५ रोजीं जपान्यांनीं रंगून सोडलें व माघार घेण्यास सुरवात केली. जपानी माघार घेणार अशा बातम्या रोज येत होत्या. पण शेवटच्या क्षणापर्यंत ब्रम्ही मंत्र्यांनासुद्धां त्याची कल्पना जपान्यांनीं दिली नाहीं. बँकॉकला सर्व कचेऱ्या नेण्याचें ठरलें. बा मॉ, थाकिन नू वगैरे सारे निघाले. या पळापळींत थाकिन नूं त्यांची पत्नी व दोन लहान मुलें यांचे फार हाल झाले. त्यांचें सर्व सामान नाहींसे झालें. मूडॉनला असतांना १४ ऑगस्टला बा मॉनें जपानी वकिलाचें अत्यंत गुप्त पत्रक नूंना वाचून दाखविलें. जपानी शरणागतीची ती बातमी होती. थाकिन नूं ना अतिशय आनंद झाला. आतां युद्ध संपलें, आपल्याला पूर्ववत् साहित्यसेवा करतां येईल असें त्यांना वाटलें. या आनंदाच्या भरांत त्यांनीं ही बातमी आपल्या पत्नीला सांगितली. तिलाहि अतिशय आनंद झाला -- युद्ध संपलें म्हणून नव्हे! तर तिच्या राजकारणी पतीनें आयुष्यांत प्रथमच एक राजकीय गौप्य तिला सांगितले होतें म्हणून!

— नारायण य. डोळे

---

## नाझी अत्याचारांची कहाणी

दुसऱ्या महायुद्धाच्या धामधुमीच्या दिवसांत एक छोटें पुस्तक प्रसिद्ध झालें होतें. त्या पुस्तकांत सामान्य नागरिकांनीं शत्रूच्या सैनिकांना सुद्धां दया दाखवून माणुसकीनें कसें वागविलें याबद्दल अनेक सैनिकांचे अनुभव एकत्र करण्यांत आले होते. युद्धाच्या खडतर काळांत माणुसकीची आठवण देणें जरूर आहे हा तें पुस्तक प्रसिद्ध करण्याचा उद्देश असावा. आज त्या पुस्तकाचें स्मरण होण्याचें कारण असें आहे कीं आतां शांततेच्या काळांत (अर्थात् अधिकृत जागतिक युद्धघोषणा नाहीं म्हणून) एक भयानक पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें असून त्या पुस्तकांत नाझी जर्मनीनें युद्धकाळांत केलेल्या अमानुष अत्याचारांचा








संक्षिप्त इतिहास दिलेला आहे. या इतिहासाचें खास स्मरण करून देण्याची आज वेळ आली आहे यांत शंका नाहीं. या भयानक इतिहासाचें विस्मरण होऊं नये ही गोष्ट महत्त्वाची आहे. आतां पश्चिम जर्मनीला युरोपीय सैन्यांत स्थान देण्याची कारवाई अमेरिकन दडपणानें पुरी झाली आहे, इतकेंच नव्हे तर या संयुक्त सैन्याला अणु-शस्त्रास्त्रें द्यावीं असें पण ठरलें आहे. पश्चिम जर्मनींत परवां गुन्हेगार ठरलेले नाझी अधिकारी व सैनिक पुनः वर डोकें काढून अधिकारपदावर येत आहेत ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे या पुस्तकाच्या प्रसिद्धीचा समय किती योग्य आहे याची कल्पना येईल.

या पुस्तकाचें नांव– 'The Scourge of Swastika' 'स्वस्तिकचा शाप' असें असून हें पुस्तक कॅसल या प्रकाशनसंस्थेनें ऑगस्ट १९५४ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. (दुसरी आवृत्ति सप्टेंबर १९५४)–पुस्तकाचे लेखक लॉर्ड रसेल ऑफ लिव्हरपूल हे असून त्यांनीं या पुस्तकाच्या प्रसिद्धीपूर्वी सरकारी नोकरीचा राजीनामा द्यावा लागला. लॉर्ड रसेल हे कायदेपंडित असून १९४८ ते मे १९५१ पर्यंत ते ब्रिटिश मिलिटरी कोर्टांत चाललेल्या नाझी युद्ध गुन्हेगारांच्या खटल्यांत ब्रिटिश मुख्य सेनानींचे कायद्याचे सल्लागार होते. १९५१ मध्यें लंडनमधील सैन्याचे ॲसिस्टंट जज्ज, ॲडव्होकेटजनरल म्हणून ते रुजूं झाले व ८ ऑगष्ट १९५४ ला त्यांनीं आपल्या सरकारी नोकरीचा राजीनामा दिला आणि त्याच महिन्यांत त्यांच्या पुस्तकाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाली. माहितगार व श्रेष्ठ अशा सरकारी अधिकाऱ्यानें १९५४ च्या ऑगस्ट महिन्यांत नाझी अत्याचाराबद्दल पुस्तक प्रसिद्ध करावें ही गोष्ट इंग्लंडमध्यें सरकारी दप्तरीं रुजूं होण्यासारखी नव्हती. पुस्तक प्रसिद्ध करावें आणि त्यापूर्वी नोकरीचा राजीनामा द्यावा अगर पुस्तकाच्या प्रसिद्धीचा विचार दूर करावा असा पेंच लेखकाला पडला होता. त्यांत नोकरीवर पाणी सोडून लॉर्ड रसेल यांनीं पुस्तक प्रसिद्ध करण्यांत मोठें धैर्य दाखविलें आहे यांत शंका नाहीं.

१९५४ च्या सुरवातीपासून युरोपीय सैन्य-आघाडींत पश्चिम जर्मनीला दाखल करून जर्मनांच्या हातांत शस्त्रें द्यावींत किंवा काय या बाबतींत इंग्लंडमध्यें व इतर युरोपियन राष्ट्रांत मागें खडाजंगी चर्चा चालू होती. पन्नास वर्षांतील दोन युद्धांच्या अनुभवानंतर परत जर्मनीला सशस्त्र करण्याचा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा होता. इंग्लंडमधील सत्तारूढ टोरी पक्ष व मजूरपक्षाचे सत्ताधारी उजवे पुढारी ही योजना संमत करण्यासाठीं आपलें सर्व बळ पणास लावीत होते. या स्फोटक परिस्थितींत नाझी अत्याचाराबद्दलचा प्रसिद्ध होणारा अधिकारी व्यक्तीचा इतिहास साहजिकच राज्यकर्त्यांस अप्रिय वाटत होता. सामान्य लोकमतावर या पुस्तकाचा विपरीत परिणाम होऊन जर्मनीचें शस्त्रीकरण लांबणीवर पडेल अशी भीति वाटत असावी. आणि अमेरिकेला तर शस्त्रीकरण-योजना पुरी करण्याची घाई झाली होती. अशा संकटप्रसंगीं सरकारनें लेखकास सरकारी नोकर म्हणून पुस्तक प्रसिद्ध करण्यास परवानगी कां दिली नाहीं या घटनेवर प्रकाश पडतो.

भडक प्रचारानें जर्मन लोकांच्या विरुद्ध भावना चेतावणें हा या पुस्तकाचा उद्देश नाहीं. प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें "सामान्य वाचकाला जर्मनीच्या युद्धकाळांतील कांहीं गुन्ह्यांची सत्य व तंतोतंत माहिती देणें" एवढेंच पुस्तकाचें कार्य आहे. पुस्तकांत संकलित केलेली माहिती न्यायालया-समोर आलेल्या अस्सल कागदपत्रांवरून व ज्या देशांत हे गुन्हे घडले त्या देशांतील साक्षीदारांनीं दिलेल्या जबाबांवरून घेतली आहे. पुस्तकांत एकूण सात प्रकरणें असून या प्रकरणांत निरनिराळ्या प्रकारच्या गुन्ह्यांची तपशीलवार हकीगत दिली आहे. गुन्ह्यांची अमानुष स्वरूपाची वास्तव कल्पना यावी म्हणून अनेक छायाचित्रें पण पुस्तकांत आहेत. भावनावश न होतां, वकीलास साजेशा कांटेकोर शब्दांत एका अत्यंत भयंकर किळसवाण्या गुन्हेगाराची माहिती या पुस्तकांत आहे. लेखकानें आपली मतें अगर अभिप्राय एकदोन वाक्यांशिवाय अधिक विस्तारानें दिलेला नाहीं. गुन्ह्यांचा तपशील व प्रकार इतके भयावह आहेत कीं त्यांच्या खरेपणाबद्दल संशय यावा, हा प्रचारतंत्राचा भाग नसेल ना अशी भीति वाटावी! दुःखाची गोष्ट एवढीच कीं हे गुन्हे नुसतेच सत्य आहेत असें नव्हे तर त्या सत्याला न्यायालयाचा कस लागून ते सिद्ध सत्य ठरले आहेत. मराठी वाचकाला याबाबत खास सूचना देणें जरूर दिसतें. कारण परवांपर्यंत ब्रिटिश










द्वेषामुळें का असेना आपल्याकडे जर्मनीबद्दल थोडेंसें प्रेम होतें. कांहीं राजकीय ( कीं सांस्कृतिक ! ) पक्ष हिट्लर व टोजो यांच्या नांवांचा उच्चार गौरवानें करीत होते. पुस्तकांतील गुन्हे हे वानगीदाखल असून, सर्व क्रूरतेचा इतिहास लिहिणें अशक्य आहे असा लेखकाचा अभिप्राय दिसतो. कांहीं भयानक चित्रपटांवर जशी भिणाऱ्या प्रेक्षकांनां व मुलांना सूचना देण्यांत येते तशी 'भयावह' अशी सूचना या पुस्तकांबद्दल द्यावयास हवी.

लॉर्ड रसेल यांनीं २६० पानांत सांगितलेल्या ठळक गुन्ह्यांचा तपशील वगळून नोंद करावयाची झाल्यास खालील गोष्टी लक्षांत येतात :

( १ ) अत्यंत कांटेकोर हिशेबाप्रमाणें युद्धकाळांत नाझी जर्मनीनें १२० लक्ष पुरुष, स्त्रिया व मुलें यांची योजनाबद्ध कत्तल केली.

( २ ) कांहीं प्रसंगीं युद्धांत शरण आलेल्या सैनिकांना त्यांचीं शस्त्रें काढून घेऊन गिरफदार न करतां गोळ्या घालून ठार केलें.

( ३ ) सूचना न देतां शत्रुपक्षाचीं व्यापारी जहाजें जर्मनीच्या पाणबुड्यांनीं समुद्राच्या तळास पाठविलीं. जहाजावरील खलाश्यांना अगर प्रवाश्यांना वांचविण्याचा प्रयत्न न करतां त्यांचेवर बंदुकी चालविल्या.

( ४ ) व्याप्त प्रदेशांतील लोकांना गिरफदार करून ओलीस म्हणून धरून ठेविलें. जर्मन राजवटीविरुद्ध गुप्तपणें लढणाऱ्या व्यक्तींच्या नातेवाईकांना, मित्रांना पकडण्यांत येऊन त्यांचे हाल करण्यांत आले. फ्रान्समधील एका खेडयांतील ( ओरादो–सुरग्लेन ) सर्व पुरुष, स्त्रिया व मुलें यांची कत्तल केली.

( ५ ) जर्मनींतील कारखान्यांत काम करण्यासाठीं म्हणून व्याप्त प्रदेशांतून नागरिकांना सक्तीनें गुलाम म्हणून पाठविण्यांत आलें. या कामगारांना अत्यंत निर्दयपणें वागविलें; शिवाय त्यांची काम करण्याची शक्ति संपल्यावर त्यांची विल्हेवाट लावली.

( ६ ) युद्ध-कैद्यांच्या छावण्या म्हणजे पृथ्वीवरील नरक होते. या छावण्यांत कैद्यांची गटागटानें कत्तल होत असे. कत्तलीपूर्वी प्रेतासाठीं चर करण्याचें काम दुर्दैवी कैद्यांकडे असे. एका चरांत प्रेतांचे अनेक थर करण्यांत येत असत. ठार करण्यासाठीं गोळया झाडणें याशिवाय कत्तलीचे अभिनव शास्त्रीय मार्ग शोधून काढले होते. खास तयार केलेल्या कोठड्यांतून गॅसनें कैद्यानां यमसदनास रवाना करण्यांत येई. प्रेतांची व्यवस्था आधुनिक पद्धतीच्या कारखान्यांतील भट्ट्यांप्रमाणें भट्ट्या रचून करण्यांत आली होती.

( ७ ) कत्तलीपूर्वी कैद्यांच्या जवळच्या वस्तू, कपडे काढून घेण्यांत येत. शिवाय मृत्यूनंतर कैद्यांचे दांतांतील सोनें वितळून राष्ट्रीय बँकेत जमा करण्यासाठीं पाठविण्यांत येई. उदाहरण म्हणून द्यावयाचें झाल्यास पोलंड मधील (वॉर्सापासून १६० मैलावरील) Auschwitz ऑस्स्विट्झ कॅम्पच देतां येईल. या कॅम्पमध्यें कैद्यांचें सामान जप्त करून तें सांठविण्यासाठीं ३५ खास इमारती होत्या. आणि त्यांपैकीं २९ इमारती व त्यांतील मालमत्ता जर्मनांनीं पळून जाण्यापूर्वी जाळून टाकली; तरी राहिलेल्या इमारतींत जर्मन सेना निघून गेल्यावर ३,४८,८२० सूट्स, ८,३६,२५५ स्त्रियांचे पोषाख, ५,५२५ बुटांच्या जोड्या इत्यादि वस्तू सांपडल्या ( पृ. १७३ ).

( ८ ) छावण्यांतील कैद्यांना कपडे व अन्न अपुरें होतेंच; शिवाय राहावयास पण जागा अत्यंत दाटीची होती. सहा हजार लोकांची सोय असलेल्या एका छावणींत १९४५ मध्यें पंचेचाळीस हजार कैदी होते. कैद्यांना वैद्यकीय मदत (!) फक्त मृत्यूच्या प्रमाणपत्रांपुरती होती. छावण्यांतील कैद्यांचा उपयोग अत्यंत क्रूर असे वैद्यकीय प्रयोग करण्यासाठीं जबरदस्तीनें केला जात असे.

( ९ ) ज्यू–वंशावर हिट्लरचा अधिक रोष–म्हणून युरोपांतील ज्यूंचा प्रश्न सोडविण्याचा अभिनव व अखेरचा मार्ग म्हणून सर्व ज्यू–वंश नाश करण्याची योजना आंखली होती. पोलंड–मधील वॉर्सा शहरांतील चार लक्ष ज्यूंची या योजनेखालीं कत्तल करण्यांत आली.

वरील सर्व प्रकारांत पुरुष, स्त्रिया, लहान मुलें, वृद्ध असा भेदभाव नव्हता. लहान मुलांची व मातांची एकत्र आहुति देण्यांत आली.

या सर्व गुन्ह्यांचा तपशील व आंकडेवारी लॉर्ड रसेल यांनीं आपल्या पुस्तकांत दिली आहे. मानवी क्रूरता कोणत्या थराला जाऊं शकते याची संपूर्ण साक्ष या पुस्तकांत आहे. स्वतःला अधिक सुसंस्कृत समजणाऱ्या श्वेतवर्णीयांनीं आपल्या बांधवांवर केलेले हे



अनुक्रमणिका






अत्याचार इतिहासांत अजोड ठरतील.

पण क्रूरतेचा उच्चांक एवढेंच या प्रकाराचें वैशिष्ट्य नाहीं. यापूर्वी युद्धांत अत्याचार झाले नाहींत असें नाहीं. युद्ध हाच मोठा क्रूरतेचा खेळ असल्यामुळें अत्याचारांत फरक असेल तो प्रमाणाचा. पण नाझी अत्याचारांचें वैशिष्ट्य म्हणजे हे सर्व अत्याचार पूर्वनियोजित रचनेचा भाग होता. बेजबाबदार, उन्मत्त शिपायांनीं निरपराध जनतेवर केलेल्या जुलुमांशीं या नाझी गुन्ह्यांची तुलना होत नाहीं. हे अत्याचार करण्यास सेनानी व वरिष्ठ अधिकारी हाताखालच्या सैनिकांस प्रवृत्त करीत असत.

१९३३ मध्यें हिट्लर सत्तारूढ झाल्यापासून युद्धास आरंभ होईपर्यंत या गुन्हेगारीची रंगीत तालीम खुद्द जर्मनींत झाली व त्यानंतर व्याप्त प्रदेशांत हा भयंकर प्रयोग सुरू झाला. जर्मनींतील उदारमतवादी विरोधकांचा नायनाट करण्याच्या उद्योगांत युद्धकाळांतील गुन्हेगारीचीं प्रात्यक्षिकें झालीं. राज्यकर्त्यांच्या या अमानुष प्रकारांची जर्मन लोकांना कल्पना नव्हती आणि म्हणून त्यांचा या गोष्टींशीं संबंध नाहीं असें म्हणतां येत नाहीं. कारण बरेचसे कैदी सामान्य लोकांच्या सहवासांत येत. – शिवाय छावण्यांतील नोकरवर्गांतर्फे आंत चाललेल्या छळाची कहाणी बाहेर पडत असे. पण जर्मनींतील जनतेनें याबाबतींत कांहीं तक्रार केली नाहीं. याचें कारण असें असावें कीं हिट्लरच्या राजवटींतील 'वंशश्रेष्ठते'च्या तत्त्वाचें विष सामान्य नागरिकांच्या अंगांत सतत प्रचारानें व विरोधी पक्षाचा पुरा बींमोड करून इतकें भिनविण्यांत आलें होतें कीं, अत्याचार ही कर्तृत्वाची व पराक्रमाची बाब झाली. सैन्यांतील अधिकाऱ्यांची एकमेव पुढाऱ्यांच्या शब्दांवर सारी मदार असल्यामुळें हुकुमाची आज्ञा पाळणें एवढेंच कर्तव्य ते ओळखत. आणि या गुन्हेगारीबद्दल त्यांना विषाद नव्हता. थोडक्यांत, नाझी पक्षाचें तत्त्वज्ञान या गुन्हेगारीनें सदेह प्रकट झालें होतें असें म्हणणें अवास्तव ठरणार नाहीं. सर्व कत्तलीचे, लुटीचे व हिंसेचे जमन लोकांनीं त्यांच्या शिस्तप्रिय स्वभावाप्रमाणें चोख हिशेब ठेविले आहेत. वॉर्सामधील ज्यूंच्या चार लाखांच्या वस्तीच्या निकालानंतर मुख्याधिकारी मेजर जनरल स्ट्रूप यानें अहवाल सादर केला होता. अहवालाच्या पहिल्या पानावर ' महत्त्वाचा कार्यभाग ' अशी सुरुवात असून हा अहवाल उत्तम बांधणीचा आदर्श आहेच शिवाय कागदहि उच्च प्रतीचा आहे. ( पृ. २३१ ).

तेव्हां दुष्ट अधिकारी व क्रूर सैनिक यांचीं बेजबाबदार कृत्यें असा हा क्रूरतेचा अर्थ लावणें कठीण आहे. ज्या तत्त्वज्ञानांत एका वंशाची श्रेष्ठता गृहीत धरण्यांत येते, त्या तत्त्वज्ञानाबरोबर असा अमानुष व्यवहार येतोच. वर्णद्वेषानें पेटलेल्या द. अफ्रिकेंत अशी क्रूरता आज दिसते याचा अर्थ हाच असावा. ७ फेब्रुआरी १९५४ ला नैरोबीहून आलेल्या बातमीप्रमाणें नानयुकी या गांवांतील पांच हजार वस्तीपैकीं तीन हजार लोकांना एक हजार पोलिस व सैनिकांच्या तुकडीनें पहांटे सगळ्या गांवांला अचानक वेढा घालून गिरफदार केलें. या लोकांना वेढा देण्याचें कारण त्या गांवांतून मावमाव चळवळीस मदत होते असा अधिकाऱ्यांचा कयास होता ( ' टाइम्स ऑफ इंडिया ' ८।२।१९५५ ).

लॉर्ड रसेल यांच्या पुस्तकाचा परिचय करून देतांना ' न्यू स्टेट्स्मन अँड नेशन ' या साप्ताहिकाचे संपादक मि. किंग्ज्ले मार्टिन यांनीं असा सल्ला दिला होता कीं लॉर्ड रसेल यांच्या पुस्तकाचा जर्मन शाळांतून पाठ्य-पुस्तकासारखा उपयोग करावा. ( 'न्यू स्टेट्स्मन–' २१ ऑगस्ट १९५४ ) – पश्चिम जर्मनींत सध्यां नाझी राजवटीचा इतिहास परत लिहिण्याचे पद्धतशीर प्रयत्न चालू असून युद्धकाळांतील प्रमुख नाझी अधिकारी भूतकाळावर पडदा टाकीत आहेत. खोट्या कागदपत्रांचा उपयोग करून सत्याला झिलई देण्याचा प्रयत्न सुरू आहे. ' मँचेस्टर गार्डियन ' च्या जर्मनीमधील खास बातमीदारानें दैनिक वृत्तपत्रांतून पश्चिम जर्मनीचा इतिहास कसा परत लिहिला जात आहे याचा भरपूर तपशील दिला आहे. ( ९ सप्टेंबर १९५४ ). पश्चिम जर्मनींतील शाळांतून वापरण्यांत येणाऱ्या एका सरकारमान्य पुस्तकांत हिट्लरच्या ' निर्वंश ' करण्याच्या धोरणाबद्दल फक्त तेरा ओळी मजकूर असून "वंशाच्या तत्त्वाचा दुरुपयोग ' असा सौम्य शेरा दिला आहे. युद्ध – गुन्ह्याच्या खटल्याबद्दलचा या पुस्तकांतील उल्लेख सुद्धां महत्त्वाचा आहे. जर्मन लोक या खटल्याबद्दल साशंक आहेत कारण त्यांची अशी खात्री आहे कीं बऱ्याच शिक्षा अन्याय्य होत्या. खटल्यांतील वकील व








न्यायाधीश यांच्यावर द्वेषाच्या प्रचाराचा परिणाम झाला होता आणि बरेच साक्षीदार त्रिनभरंवशाचें होते. शिवाय गुन्हेगारांचे कडून जबरदस्तीनें कबुलीजबाब घेण्यांत आले." ('न्यू स्टेटस्मन' – पत्रव्यवहार १८ सप्टेंबर १९५४ पृ. ३२६) पूर्व जर्मनींत मात्र परिस्थिति या विरुद्ध असून शाळेंतील मुलांनां नाझी अत्याचाराची योग्य माहिती देण्यांत येते असें वरील पत्र-लेखकानें स्पष्ट केलें आहे. लॉर्ड रसेल यांच्या पुस्तकावरून सर्व लोक योग्य तो बोध घेतील अशी आशा करावयास हरकत नाहीं. आपल्या देशाला युद्धाची प्रत्यक्ष झळ न लागल्यामुळें आपल्याला हे अनुभव अपरिचित वे अतिरंजित वाटणें साहजिक आहे. पण गेल्या युद्धाचें खरें स्वरूप समजण्यास त्यांचा उपयोग होईल हें निश्चित.

— शा. म. जोशी

## आंतरराष्ट्रीय राजकारण

# सार संकलन

### आइसेनॉवर यांचें 'निवेदन'

अमेरिकेचे अध्यक्ष आइसेनॉवर यांनीं ता. ६ जानेवारी १९५५ रोजीं 'कॉंग्रेस'ला (अमेरिकेच्या कायदे-मंडळाला) राज्यांतील परिस्थितीबाबतचें निवेदन पाठविलें. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें देतां येईल:

"आज जगांत शांतता नांदत आहे. परंतु ही निश्चितपणें असुरक्षित शांतता आहे. मात्र बऱ्याच काळानंतर कां होईना पण जगांत कोठेंहि प्रत्यक्ष महत्त्वाची लढाई सुरू नाहीं; या साध्या घटनेंत मानवजातीला आशा दिसत आहे. या साध्या घटनेमुळेंच इतर राष्ट्रांशीं सहकार्य करून प्रत्येक व्यक्तीचें कल्याण, स्वातंत्र्य आणि स्वाभिमान यांकरितां परिणामकारक प्रयत्न करण्याची आम्हांस प्रेरणा मिळत आहे. ... तथापि एक विचारार्ह प्रश्न शिल्लक आहेच. सोव्हिएट कम्युनिस्ट गटानें निर्माण केलेलें विशाल लष्करी षड्यंत्र आणि त्या गटाच्या महत्त्वाकांक्षा यामुळें जगांत अस्वस्थतेचें वातावरण कायम आहे. ... बाह्य आक्रमण आणि अंतर्गत राज्य उलथून पाडण्याचे प्रयत्न या दोहोंबाबत राष्ट्रांनीं दक्षता बाळगणें जरूर आहे."

शांतता न्याय्य आणि टिकाऊ स्वरूपाची होईल, असे प्रयत्न केले पाहिजेत असें सांगून त्यासाठीं शैक्षणिक देवाण – घेवाण, परराष्ट्रांना आर्थिक साहाय्य, जकातीचे दर कमी करून मालाची देवाणघेवाण वाढवणें, आणि संरक्षणाला मजबुती आणण्याचें कार्य चालू ठेवणें इत्यादि बाबींचा आइसेनॉवरनीं उल्लेख केला. ते पुढें म्हणाले :

" शांतता आणि स्वातंत्र्य याविषयींचे प्रयत्न चालू रहावेत याकरितां महत्त्वाच्या सार्वजनिक स्थानावर असलेल्या व्यक्तींनीं खाजगी वा आपापल्या गटाविषयींचा विचार दूर ठेविला पाहिजे; सामाजिक कल्याणासाठीं आपले पक्षनिष्ठ वा खाजगी अभिमान आणि पूर्वग्रह बाजूस ठेवले पाहिजेत. ... राज्यांतील कायदेमंडळें आणि कार्यकारी सत्ता यांच्यावर दोन भिन्न पक्षांचें प्रभुत्व असल्यामुळें अमेरिकन जनतेपुढें दोन्ही पक्षांची परीक्षा होण्याचीच ही वेळ आहे. भूतकाळांत अशा परिस्थितींत राज्यसंस्था अडून पडल्याचीं उदाहरणें आहेत. यावेळीं आपण असें होऊं देतां कामा नये." ...

" १९५४ हें वर्ष आपल्या इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाचें सुबत्तेचें वर्ष होतें. उद्योगधंद्यांची व आर्थिक व्यवहाराची प्रगति झाली आहे. उत्पादन वाढत आहे. अधिकाधिक लोकांना कामधंदा मिळत आहे. कारखान्यांतील कामगारांच्या पगाराचें मान आजवर कधीहि नव्हतें इतकें अधिक आहे. कर वजा जातां उरणारी प्राप्ति भरपूर आहे. रहाणीचें मान सुधारत आहे. नवीं बांधकामें मुबलक प्रमाणांत होत आहेत. आपल्या मालाला परदेशांत भरपूर मागणी आहे. राज्य व स्थानिक संस्था कितीतरी अधिक प्रमाणांत सार्वजनिक उपयुक्ततेचीं कामें हातीं घेत आहेत. बचतीचें प्रमाण वाढत आहे. भांडवलाचा पुरवठा भरपूर आहे. एकंदरीनें आर्थिक परिस्थिति चांगली आहे. आर्थिक व्यवहारांतील एक महत्त्वाची बाब म्हणजे शेतीला प्राप्त झालेलें स्थैर्य व सुबत्ता ही होय."










अनुक्रमणिका

## फॉर्मोसाचा प्रश्न

या महिन्यांतील महत्त्वाचा आंतरराष्ट्रीय राजकारणांतील प्रश्न म्हणजे फॉर्मोसाचा प्रश्न होय. केवळ राजकीयच नव्हे तर लष्करी आणि कायद्याच्या दृष्टिकोनांतूनहि या प्रश्नावर बरीच चर्चा झाली आहे. सुरक्षामंडळाचें आमंत्रण लाल चीननें नाकारल्यामुळें तूर्त हा प्रश्न भिजत पडला आहे. या प्रश्नाच्या कायदेशीर आणि राजकीय अशा दोन्ही बाजूंसंबंधीं पुढील मुद्दे ध्यानांत घेतां येण्यासारखे आहेत :

१७ व्या शतकाच्या अखेरीस फॉर्मोसा बेट हें चीनचा भाग म्हणून त्यांत समाविष्ट केलें गेलें. चीन व जपान यांच्यांतील १९ व्या शतकाच्या अखेरीस झालेल्या युद्धांत जपानचा विजय झाला. या युद्धानंतरच्या शिमोनोसेकी – तहाअन्वयें फॉर्मोसा बेट जपानला देण्यांत आलें. आणि जपाननें जून १८९५ मध्यें या बेटाचा ताबा घेतला. तेव्हांपासून १९४५ सप्टेंबरमध्यें दुसऱ्या महायुद्धांत जपानचा पराभव होईपर्यंत व त्यानंतरहि कांहीं काळ प्रस्तुत बेट जपानच्या ताब्यांत होतें.

" 'डेली हेरल्ड'चे परराष्ट्रीय वार्ताहर डब्लू. एन्. युवेर यांनीं म्हटल्याप्रमाणें दुसऱ्या महायुद्धानंतर जपानशीं शांततेचा करार होईपर्यंत फॉर्मोसा कायद्यानें जपानच्याच सार्वभौमत्वाखालीं होता; सर्व दोस्तराष्ट्रांच्या संमतीनें चँगकैशकला फॉर्मोसातील शासनाधिकार दिले गेले या घटनेमुळें वरील भूमिकेला बाध येत नाहीं. "

८ सप्टेंबर १९५१ च्या सॅनफ्रान्सिस्को येथील जपानी शांतता-करार कलम २ ( ब ) प्रमाणें "जपान फॉर्मोसा आणि पॅसेडॉर बेटावरील आपले सर्व हक्क, अधिकार व दावा सोडीत आहे. "

" फॉर्मोसावरील सार्वभौमत्वाचा प्रश्न सॅन्फ्रान्सिस्कोच्या करारानें निर्णीत झाला आहे " असें सर अँन्थनी इडन यांनीं कामन्स-सभेमध्यें म्हटलें.

डिसेंबर १९४३ मध्यें कैरोला प्रे० रुझवेल्ट, चँगकैशेक आणि चर्चिल यांनीं घोषणा केली कीं : "मांचुरिया, फॉर्मोसा, पॅसेडॉर वगैरेसारखे जपाननें चीनकडून अपहरण केलेले प्रदेश चीनला परत केले जावेत असा आमचा हेतु आहे. " या घोषणेचा पॉटस्डॅम येथें पुनरुच्चार करण्यांत आला. या घोषणेबाबत लॉर्ड रीडिंग लॉर्डस् सभेमध्यें म्हणाले कीं, " कैरोची घोषणा ही केवळ तीन राष्ट्रप्रमुखांच्या धोरणाविषयीची घोषणा असून तिची अंमलबजावणी करण्याची कसलीहि तरतूद करण्यांत आलेली नव्हती. तिला कायद्याच्या दृष्टीनें महत्त्व नाहीं. " इडननीं कॉमन्स-सभेंत खुलासा केला कीं, " मात्र फॉर्मोसा आणि पॅसेडॉर यांजबद्दलची ही भूमिका चीनलगतच्या इतर बेटांना लागूं नाहीं. हीं बेटें नेहमींच चीनचा एक भाग म्हणून समजलीं गेलीं आहेत. आणि चीनची कायद्यानें त्यांच्यावर सार्वभौम सत्ता आहे असें म्हणतां येईल. "

फॉर्मोसाविषयक परिस्थितीसंबंधी 'ऑब्झर्वर' पत्रानें आपल्या ५ फेब्रुवारीच्या अंकांत पुढील अभिप्राय दिला आहे :

" बहुतेक सगळें जग फॉर्मोसा युद्ध-तहकुबीविषयीं प्रयत्न करीत असतांना चौएनलाय आणि चँगकैशेक या दोन्ही नेत्यांचा तें चालूं ठेवण्याचा हेतू दिसत आहे. युद्धतहकुबीची चर्चा करण्यासाठीं देण्यांत आलेलें संयुक्त राष्ट्रांचें आमंत्रण चौनें नाकारलें. अमेरिकेच्या साहाय्यानें कमॉय बेटाचें संरक्षण करण्याची घोषणा चँगनें केली. दोघांनाहि लढाई चालू रहाण्यांत आपले हितसंबंध सुरक्षित रहातील असें वाटतें.

"अमेरिकेचें सातवें आरमार फॉर्मोसाचें रक्षण करीत असेपर्यंत तें बेट काबीज करणें नाविकबलाच्या अभावीं चौला मुळींच शक्य नाहीं. किनाऱ्यालगतचीं बेटें काबीज करून चँगच्या सैन्याचें नैतिक मनोधैर्य कमी करणें अथवा वादातीत अशा या चीनच्या प्रदेशासाठीं आपलें सैन्य उपयोगांत आणावयास लावून अमेरिकेला अडचणींत टाकणें एवढीच आशा तो करूं शकतो.

" किनाऱ्यालगतचीं बेटें शांतपणें सामोपचारानें सोडल्यास 'चीनचें राज्यकर्ते' म्हणून असलेला आपला दावा संपुष्टांत येईल यांची चँगला जाणीव आहे. त्यामुळें निश्चित युध्यमान भूमिका घेऊन अमेरिकेंतील लोकमत भडकविणें हाच मार्ग त्याच्यापुढें आहे. या मार्गानें एक तर या लढाईंत अमेरिका ओढली तरी जाईल किंवा ती आपल्या मित्रांना सोडून देते असा आरोप करतां येईल.

" अशा प्रकारच्या माथीं भडकविणाऱ्या परिस्थि-







तींत भविष्यासंबंधी विचार करतांना विवेकीपणा कायम राखणें ही पहिली महत्त्वाची गरज आहे. चौ आणि चँग यांच्या लष्करी हालचाली ताबडतोब बंद न केल्यास जागतिक अणुयुद्धाचा स्फोट होईल असें अनेकजण म्हणतांना दिसतात. परंतु आम्हास असें मुळींच वाटत नाहीं हें स्वच्छपणें सांगण्याचें आम्ही धाडस करतों. आजकालचीं जागतिक युद्धें अशा मामुली घटनांतून आतां निर्माण होऊं शकत नाहींत. जागतिक सत्तेचा समतोलपणा बिघडण्याचा संभव निर्माण झाल्यावांचून युद्ध होऊं शकत नाहीं. कोरिया किंवा इंडोचायनाच्या मानानें फॉर्मोसाच्या सामुद्रधुनींत – किंबहुना फॉर्मोसा बेटांत देखील – या दृष्टीनें विशेष काहींच अडलेलें नाहीं."

फॉर्मोसाबाबत 'मँचेस्टर गार्डियन' (२९ जानेवारी १९५५) म्हणतो : "शांततारक्षणाचा उत्तम मार्ग म्हणजे अन्य राष्ट्रांचे पडद्यामागील प्रयत्न हा होय. बेपर्वाईनें वागल्यास निर्माण होणाऱ्या धोक्याची पेकिंगला जाणीव देणें आणि चीनकडून होणाऱ्या शांततेस पोषक अशा कोणत्याहि सूचनेचा सहानुभूतीनें विचार करण्यास अमेरिकेस सांगणें हा अशा प्रयत्नांचा हेतु असला पाहिजे. याचवेळीं सुदैवानें कॉमन्वेल्थ परिषद् भरत असल्यामुळें तिच्यांत या प्रश्नाचा ऊहापोह होणें स्वाभाविक आहे.

"प्रस्तुत संकटमय परिस्थितींत रशियाचें धोरण काय राहील ? या अरिष्टांतून प्रत्यक्ष युद्ध उद्भवण्यापर्यंत परिस्थिति बिघडत जाणें हें रशियाच्या हिताचें नाहीं. परंतु परिस्थिति अशीच चिघळलेली रहाणें यांत मात्र कम्युनिझमला फायदा आहे."

'अतिपूर्वेकडील संधि' या मथळयाखालीं 'संडे टाइम्स' लिहितोः "अतिपूर्वेकडील परिस्थिति धोक्याची असून तो धोका कमी करणें हें प्रत्येक सूज्ञ माणसाचें कार्य असलें पाहिजे. यादवी म्हणा वा न म्हणा, युद्ध हें युद्धच आणि त्यापासून सर्व जगाला धोका निर्माण होणें शक्य आहे. खरा प्रश्न त्याला कोणतें नांव द्यावयाचें हा नसून तें बंद कसें करावयाचें हा होय.

"चँगकैशेकशीं झालेला करार, 'कॉंग्रेस' ला आइसेनॉवर यांनीं पाठवलेला संदेश, फॉर्मोसाकडे पाठविलेलें हवाई-दल इत्यादि घटनांतून व्यक्त होणाऱ्या अमेरिकेच्या धोरणावर बरीच टीका होत आहे. परंतु या टीकेंतून दोन मूलभूत गोष्टींकडे दुर्लक्ष झालेलें दिसतें. आपली जबाबदारी स्पष्ट व मर्यादित – फॉर्मोसा व पॅसेडॉर यापुरतीच – करणें आणि पेकिंगला वस्तुतः मान्यता देणें ही गोष्ट त्या धोरणांत स्पष्ट आहे. त्याबरोबरच चीनमधून फॉर्मोसावर हल्ला करण्याच्या लष्करी व प्रचारात्मक धमक्यामुळें तें धोरण अधिकाधिक तीव्र बनत आहे.

"या बेटांना अवास्तव महत्त्व देण्यांत आलें आहे. तेथें चाललेल्या घटनांवरून जागतिक युद्ध उद्भवेल असें नाहीं. कम्युनिस्ट चीननें फॉर्मोसावर प्रत्यक्ष हल्ला केल्यावांचून युद्ध संभवत नाहीं. आणि याबद्दलचा निर्णय सर्वस्वी पेकिंगवरच अवलंबून आहे. त्याचप्रमाणें युद्ध – तहकुबीची आजची महत्त्वाची गरज पुरी करणें हें देखील पेकिंगवरच अवलंबून आहे.

"कम्युनिस्टांना युद्ध नको असल्यास तें बंद होऊं शकेल; एरव्ही नाहीं. चँगकैशेकला बाह्य मदतीवांचून तें चालवितां येणें शक्य नाहीं. कम्युनिस्टांना युद्ध हवें कीं नको हें कोडें आहे. कदाचित् त्यांना तें हवें असेलहि. परंतु त्यांचें मन वळविण्याचे शिकस्तीचे प्रयत्न होणें जरूर आहे. अर्थात् ते त्याबद्दलची किंमत मागतील. आणि किनाऱ्यालगतचीं बेटें सोडणें हा त्या किंमतीचाच एक भाग होय."

## राष्ट्रकुलपरिषदेचें पत्रक

फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यांत लंडन येथें भरलेल्या राष्ट्रकुलपरिषदेच्या पत्रकांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें देतां येईल :

"राष्ट्रकुलांतील पंतप्रधानांच्या १९५३ सालीं भरलेल्या परिषदेच्या काळांत जगांतील निरनिराळ्या भागांत करार झाले असून त्यांच्या योगानें मतभेद होण्यास व निरनिराळीं राज्यें व जनता यांच्यांत सलोखा निर्माण होण्यास मदत झाली आहे. ट्रिस्टेबाबतचें भांडण मिटलें, ही घटना पंतप्रधानांना स्वागतार्ह वाटते. त्याचप्रमाणें मध्यपूर्वेतील इजिप्त व इराण आणि ब्रिटिश यांमधील मतभेद मिटल्याबद्दल त्यांना समाधान वाटतें. जनतेच्या कल्याणासाठीं आर्थिक विकास व्हावा याकरितां या प्रदेशांतील राष्ट्रांत अधिक सहकार्याचें वातावरण निर्माण होईल अशी आशा त्यांनीं व्यक्त केली. त्याचप्रमाणें अतिपूर्वेकडील इंडोचायनामधील कलह मिटल्याबद्दल त्यांना समाधान वाटत असून



अनुक्रमणिका






या भागांत स्थैर्याची व लोककल्याणकारी प्रयत्नांची वाढ होईल आणि जिनेव्हा-करार पाळला जाईल याची दक्षता बाळगणें ही एक महत्त्वाची गरज आहे.

" ही बैठक भरण्याच्या वेळीं अतिपूर्वेकडील परिस्थिति अडचणीची होती. बैठक चालू असतांना घडलेल्या घटनांमुळें तिला विशेष महत्त्व प्राप्त झालें. शांतता प्रस्थापित करण्याचे मार्ग शोधीत असतांना कलहाचे प्रसंग टाळले जाणें आवश्यक आहे असें सर्व पंतप्रधानांचें स्पष्ट मत आहे. या परिषदेंत झालेल्या मोकळ्या प्रत्यक्ष चर्चेवरून आपापसांत व इतर राष्ट्रांशीं चर्चा करून याबाबत धोरण निश्चित करतां येईल असें त्यांना विश्वासपूर्वक म्हणतां येतें."

याव्यतिरिक्त पत्रकांत आर्थिक परिस्थिति आणि अणुशक्तीमुळें निर्माण झालेला धोका यांचाहि विचार झाल्याचा उल्लेख आहे.

## मॅलेंकॉवचा राजीनामा

मॅलेंकॉवच्या राजिनाम्याबाबत डब्लू. एन्. युवेर लिहितात :

" मॅलेंकॉव्हचा राजीनामा ही त्यांतील आकस्मिकपणा व एकंदर पार्श्वभूमि ध्यानांत घेतल्यास एक नाट्यपूर्ण घटनाच होय. तथापि एकी आणि ' सामुदायिक नेतृत्व ' यांच्या बाह्य देखाव्यामागें चालू असलेल्या सत्ताकलहाची माहिती असणारांना त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें काहीं नाहीं. लोकोपयोगी वस्तूंचें उत्पादन वाढविण्याच्या मॅलेंकॉव्ह यांच्या राजवटीशीं विशेष संबंधित असलेल्या धोरणावर गेले काहीं आठवडे रशियन वृत्तपत्रांतून टीका सुरू होती.

" पंतप्रधानांच्या झालेल्या बदलावरून ' स्टालीन पद्धती 'ची राजवट पुनः सुरूं होत आहे हें प्रथमतः सहज ध्यानांत आल्यावांचून रहात नाहीं. कोणताहि हुद्दा स्वतःकडे न घेतां क्रुशेव्ह हा १९२७-२८ सालांतील स्टालिनप्रमाणें खराखुरा सत्ताधीश व हुकूमशहा होत आहे. कम्युनिस्टपक्षाचा सेक्रेटरी या नात्यानें सर्वशक्तिशाली पक्षसंघटना हातीं घेऊन तो राज्य करणार आहे. शासनसंस्थेच्या सर्व विविध क्षेत्रांत व पातळीवर पक्षाचें वर्चस्व राहिलें पाहिजे ह्या मुद्द्यावर अलीकडे बराच भर देण्यांत आला आहे.

" स्टालिनतंत्राचा अगदीं तपशीलवार अवलंब क्रुशेव करीत असावा असें दिसतें. सोव्हिएट राज्याचा प्रमुख म्हणून लेनिननंतर रायकॉव आला. आणि त्याची जी गत झाली तीच मॅलेंकॉवची होणार असा रंग दिसतो. बऱ्याच टीकेनंतर रायकॉवला सुमारें २५ वर्षांपूर्वी आपल्या स्थानापासून हलविण्यांत आलें. त्यानें आपल्या चुका कबूल केल्या, आपले मार्ग सुधारण्याचें आश्वासन दिलें; आणि त्यामुळें सामान्य मंत्री म्हणून त्याची नेमणूक झाली. पांच वर्षांनंतर त्याच्यावर पुनः आरोप करण्यांत आले, खटला भरला गेला आणि त्याला गोळी घातली गेली."

बुल्गॅनिन हा केवळ नाममात्र पंतप्रधान आहे आणि अशा स्थानाला तो योग्यहि आहे असें प्रतिपादन करून युवेर पुढें म्हणतातः

" बेरिया गेला, मॅलेंकॉव्ह स्थानभ्रष्ट झाला आणि बुल्गॅनिन हा नामधारी पंतप्रधान आहे. यामुळें क्रुशेवला आतां महत्त्वाचा प्रतिस्पर्धी उरलेला नाहीं. स्टालीनच्या मरणसमयीं पक्षाच्या अध्यक्षमंडळांत असलेल्या सात जणांपैकीं मोलोटॉवनें आतां वयोवृद्ध मुत्सद्द्याचें स्थान पत्करलें आहे. परराष्ट्रीय राजकारणांतच त्याचें सर्व लक्ष गुंतलें असून अलिकडे क्रुशेवशीं मिळतें घेण्याचा तो प्रयत्न करीत आहे. वॅरोशिलाव हा केवळ शोभेचा राज्यप्रमुख आहे, कागानोविच् म्हातारा झाला आहे; शिवाय तो ज्यू आहे. मिकोयानचें स्थान निश्चित नाहीं व तो आर्मेनियन आहे. सबुरॉव आणि पर्वुकिन् हे भावी नेते म्हणतां येतील. पण त्यांना अजून महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलें नाहीं.

" स्टालिनच्या मृत्यूनंतर अवघ्या दोन वर्षांच्या आंतच सामुदायिक नेतृत्वाचा काळ संपुष्टांत आला असा रंग दिसत आहे. रोझा लुक्झेंबर्ग आणि ट्रॉट्स्की यांनी मागें बजावलें होतें कीं ' पक्षाची हुकूमशाही ' ही प्रथम समितीची हुकूमशाही बनली आणि नंतर व्यक्तीची हुकूमशाही या स्वरूपांत तिचें रूपांतर झालें. तोंच प्रसंग पुनः येऊं पहात आहे.

" वस्तुतः सत्ता उपभोगावयाची पण नांव मात्र दुसऱ्याचें अशा परिस्थितींत क्रुशेव किती काळ काढणार ? स्टालिनप्रमाणेंच प्रत्यक्ष सत्तास्थान व सत्ता अशा दोन्हींचा तो स्वीकार करील काय ? त्याची सत्ता कितपत टिकून राहील ? – इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें देणें शक्य नाहीं. तूर्त एक गोष्ट मात्र निश्चितपणें सांगतां येईल; ती म्हणजे स्टालीनवाद पुनः सुरू झाला










आहे. सोविएट रशियांत नव्या झोटिंगशहाचा उदय होत आहे. ''

मॅलेंकॉव-राजीनामा या प्रकरणीं 'टाइम्स' (लंडन) १० फेब्रुवारीच्या अंकांत म्हणतो :

"मॅलेंकॉवच्या राजिनाम्याचा रशियन शेतीच्या अरिष्टाशीं अधिकृतपणें संबंध जोडण्यांत आला आहे. हें अरिष्ट काय आहे ?

"१९४० सालापासून रशियाची लोकसंख्या दर-वर्षी सुमारें ३० लक्षांनीं वाढत आहे. लढाईच्या काळांत बराच मुलूख उध्वस्त झाला वा शत्रूच्या ताब्यांत गेला. युद्धानंतर नागरी लोकसंख्येंत १ कोटी ७० लक्ष इतकी वाढ झाली आहे. जे शेतीवर उत्पादन करीत, ते आतां अन्नाची अपेक्षा करीत आहेत. ज्यांना खेड्यांत साधें, जाडेभरडें एकाच प्रकारचें अन्न चालत असे त्यांनाच आतां शहरांत आल्यामुळें मांस, दूध, लोणी, अंडीं इत्यादींचा भरपूर पुरवठा झाला पाहिजे. असें वाटूं लागलें आहे.

"१९१३ सालच्या मानानें कसणुकीचें क्षेत्र आणि उत्पादनाचें प्रमाण यांत बरीच वाढ झाली आहे. तथापि लोकसंख्याहि त्या मानानें अधिक वाढली आहे. यामुळें केवळ अधिक अन्नधान्य-उत्पादन एवढाच आतां प्रश्न नसून अधिक सकस व वैविध्यपूर्ण अन्नाचा पुरवठा होणें जरूर आहे. ''

ब्रिटनचे सोविएट रशियांतील माजी प्रतिनिधि सर डेव्हिड केली लिहितात :

"वाढत्या लोकसंख्येचें दडपण, मुद्देमालाच्या उत्पादनावर देण्यांत आलेला भर व त्याबरोबरच झालेली शेतीची अवनति यांमुळें सर्व राजवटीलाच धोका निर्माण झाला आहे. प्रत्यक्ष उपलब्ध असलेल्या माहितीवरून मला हें सर्वांत महत्त्वाचें कारण वाटतें. राजकीय दृष्ट्या समितीची राजवट (सामुदायिक नेतृत्व) संपुष्टांत आली असण्याचाहि संभव आहे. तथापि तसें निश्चितपणें म्हणतां येत नाहीं.

"मॅलेंकॉव आणि बेरिया यांच्यांत स्टालिनच्या वारसपदासाठीं कलह झाला असल्याविषयींचा प्रत्यक्ष पुरावा नाहीं. मॅलेंकॉवचें व्यक्तिमत्त्व वा त्याचा प्रभाव ध्यानांत घेतल्यास मोलॉटॉव्ह व सेनानी यांच्या हातां-तील बाहुलें म्हणूनच तो वागत होता असें म्हणतां येतें. मोलॉटॉव्ह हा एक ज्येष्ठ पुढारी असून स्टालिन-ला मोक्याचें सत्तास्थान प्राप्त होण्यांत त्याचेंच प्रयत्न बऱ्याच अंशीं जबाबदार होते.

"मॅलेकॉव्ह हा एक कष्टाळू अधिकारी आहे. स्टालि-नच्या हातचें एक महत्त्वाचें बाहुलें म्हणूनहि त्याचा उल्लेख करतां येईल.... त्याच्या बोलण्यांत वा वाग-ण्यांत गतिशील नेतृत्वाचा मागमूसहि दिसत नाहीं.

"तात्पर्य, स्टालिनच्या मृत्यूनंतर प्रस्थापित झालेली समितीची राजवट संपुष्टांत आली आहे असा निष्कर्ष काढणें थोडेसें घाईचेंच होईल. मॅलेंकॉवच्या हातीं प्रत्यक्ष दिसत होती त्यापेक्षां कितीतरी अधिक सत्ता असली पाहिजे असा त्याचा अर्थ आहे. ''

— गोवर्धन पारीख

## पुस्तक-परामर्श

**राज्यशास्त्राचा विकास:** लेखक — **श्री. स. मा. गर्गे** [ प्रकाशक स. मा. गर्गे, पुणें २, पृष्ठें ३२६, किं. ५ रु., जून १९५४. ]

श्री. गर्गे यांनीं लिहिलेलें **'राज्यशास्त्राचा विकास'** हें पाश्चात्य राजकीय तत्त्वज्ञानावरील मराठींतील पहिलेंच पुस्तक आहे, यावरून त्याचें महत्त्व ध्यानांत येईल. पुस्तकाची ओळख करून देणारी तर्कतीर्थ लक्ष्मण-शास्त्री जोशी यांची विचारपरिप्लुत प्रस्तावना व शेवटीं जोडलेले विद्वानांचे अभिप्राय यांमध्यें श्री. गर्गे यांच्या पुस्तकाचीं सर्व वैशिष्ट्यें सांगितलेलीं आहेतच. सामा-न्य मराठी वाचक व महाविद्यालयांतील विद्यार्थी यांना उपयुक्त असें हें पुस्तक आहे. आणि त्या दृष्टीनेंच तें श्री. गर्गे यांनीं लिहिलें आहे; हें पुस्तकांतील आटोप-शीर व सुबोध विवेचनावरून लक्षांत येईल. 'जें कांहीं लिहीन तें मराठींतूनच लिहीन' या इतिहासाचार्य राजवाड्यांच्या प्रतिज्ञेंत ऐकान्तिकता जरी असली तरी तथ्यहि पुष्कळ होतें व आहे, यांत शंका नाहीं. विद्यापीठांतील शिक्षणाचें माध्यम म्हणून अगदीं नजीकच्या भविष्यकाळांत मराठी स्वीकारलें जाणार आहे. अशा वेळीं तर श्री. गर्गे यांनीं लिहिलेल्या या

पुस्तकाची तीव्र आवश्यकता भासणार आहे हें निर्विवाद.

श्री. न चिं. केळकर, आचार्य जावडेकर, श्री. न. वि. गाडगीळ व खुद्द या ग्रंथाचे लेखक व प्रा. शिरसीकर यानीं 'राज्यशास्त्र' (किंवा जुन्या परिभाषेंत 'राजनीतिशास्त्र') या विषयावर ग्रंथरचना केली आहे. पाश्चात्त्य राजकीय तत्त्वज्ञानाच्या विकासावरील हें पहिलेंच पुस्तक आहे. प्रा. कोगेकरांनीं पुस्तकावरील आपल्या अभिप्रायांत म्हटल्याप्रमाणें 'राज्यशास्त्राचा विकास' हें अभिधान समर्पक वाटत नाहीं, हें खरें आहे. ग्रंथाची परिभाषा सुटसुटीत व अन्वयावत् असावी हें खरें, पण त्याप्रमाणेंच ती अन्वर्थक असावी. त्या दृष्टीनें 'राजकीय तत्त्वज्ञानाचा विकास' हें शीर्षक योग्य दिसलें असतें. राज्यशास्त्रांत तत्त्वज्ञानाशिवाय राज्यघटना, राज्यसंस्थेचा इतिहास, प्रशासनव्यवस्था ( Public Administration ) यांचा मुख्यानें समावेश होतो. शास्त्र या पदवीला वस्तुतः राज्यघटना व प्रशासनव्यवस्था हेच विषय पात्र होत. राजकीय तत्त्वज्ञानाचा उगम तत्त्वज्ञानाच्या ( विशेषतः नीतिशास्त्राच्या ) पोटीं झाला. प्रत्यक्ष परिस्थितीच्या मुशींतून राजकीय तत्त्वज्ञान धगधगून बाहेर पडलेलें असलें तरी तत्त्वज्ञानाशीं व सामान्य विचारपरंपेशीं त्याचें सहोदराचें नातें आहे हें मान्य झालें आहे. श्री. गर्गे यांनीं आपल्या प्रास्ताविक निवेदनांत राजकीय तत्त्वज्ञानामागील 'नैतिक प्रेरणे'चा उल्लेख केला आहे. यावरून त्यांनाहि हें मान्य आहे असें दिसतें.

श्री. गर्गे यानीं विषयाचें विवेचन अतिशय ओघवती भाषेंत केलें आहे. आणि विषयाची विभागणीहि त्यांनीं निवडक बारा शीर्षकांखालीं केली आहे. ग्रीस, रोम, खिश्चन धर्म, चर्च, राजा, धर्मसुधारणा, सामाजिक करार, राज्यक्रान्ति, व्यक्तिवाद, राष्ट्रवाद, समाजवाद, नव्या वाटा अशी त्यांनीं प्रकरणांची वांटणी केली आहे. प्रत्येक प्रकरणामध्यें, तत्त्वज्ञानास मूलभूत कारणीभूत असणारी भौतिकपरिस्थिति व ऐतिहासिक घटना, सर्वसामान्य राजकीय विचार व प्रातिनिधिक विचारवंत असतील तर त्यांपैकीं निवडक व्यक्तींचे विचार यांचा अंतर्भाव केला आहे विषयाच्या या मांडणीमुळें लेखकास तीनशें पानांत ग्रंथाचा प्रपंच आवरता आला. नाहींपेक्षां अशा कित्येक ग्रंथांमध्यें पसारा आटोपला नसता. सामान्य सुशिक्षित वाचकास त्यामुळें विषयप्रवेश करणें सोपें जाईल. पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळें त्यांना कांहीं विचारप्रणाली व विचारवन्त यांचा उल्लेखहि करतां आला नाहीं, इतकेंच नव्हे तर प्रतिपादनांतहि कित्येक ठिकाणीं तोकडेपणा आला आहे. पहिलें प्रकरण व शेवटचें प्रकरण हीं याचीं नमुनेदार उदाहरणें होत. एका प्रकरणांत भारतीय राजकीय तत्त्वज्ञान व चीनचें राज्यशास्त्र यांचा ओझरता उल्लेख करण्यापेक्षां तो टाळला असता तर निदान पुस्तकांतील विषयाची एकता अभंग राहिली असती. भारतामध्यें वा चीनमध्यें वा इतरत्र आशिया किंवा आफ्रिका या भूप्रदेशांत राजकीय तत्त्वज्ञान या सदराखालीं मोडणारे विचार फारसे विकसित झाले नाहींत – कारणें कांहींहि असोत– हें सत्य आहे. तरीहि पण एका आठपानी प्रकरणांत संपुष्टांत येण्याजोगा तो विषय नाहीं. 'राज्यशास्त्राचा विकास' या पुस्तकाच्या शीर्षकामुळें लेखकांस पहिल्या प्रकरणांतील विवेचन घालणें आवश्यक वाटलें कीं काय कोण जाणे ! मोजक्या प्रकरणांत विविध विचारप्रणाली गोवाव्या लागल्यामुळें कांहीं विचारवंतांचे विचार प्रकरणाच्या शीर्षकाशीं विसंगत वाटतात. ऑस्टिनचा सार्वभौमत्वाचा सिद्धान्त व्यक्तिवादाचा आविष्कार कसा होऊं शकतो ? त्यासाठीं 'कायदा व राजकीय तत्त्वज्ञान' असें पृथक् प्रकरण घालणें जरूर होतें. तसेंच ग्रीनचें तत्त्वज्ञान मुख्यतः राष्ट्रवादी कसें ? ग्रीननें हेगेलपेक्षां कान्टकडून अधिक प्रेरणा घेतली होती. ग्रीनच्या व्यक्तिवादाला नैतिक अधिष्ठान होतें; बेन्थॅमच्या व त्याच्या शिष्यांच्या उपयुक्ततावादा – ( Utilitarianism ) च्या अतिरेकावर तो एक उतारा होता. म्हणून ग्रीन ( पुस्तकांतील अर्थानें ) राष्ट्रवादाचा पुरस्कर्ता होता असें कसें म्हणतां येईल ? एके ठिकाणीं प्रतिपादनांत चुकीचें विधान आढळतें. पृष्ठ २४७ वर खालील विधान आढळतें: " धर्मसुधारणेच्या काळांत या कल्पनेला अधिक मूर्त स्वरूप आलें. 'रोमचें वर्चस्व म्हणजे आपल्या भूमीच्या बाहेरचें वर्चस्व, म्हणून तें नष्ट केलें पाहिजे' हा भाव त्याकाळीं जर्मनीनें प्रथम व्यक्त केला. " रोमन चर्चचें वर्चस्व झुगारून दिलें तेव्हां जर्मनींत राष्ट्रवादाचें बीजारोपण झालें, हें खरें आहे. पण राष्ट्रवादाच्या कल्पनेचें मूर्त स्वरूप यापूर्वींच प्रथम इंग्लंडमध्यें, नंतर फ्रान्स, पोर्तुगाल,

स्पेन या देशांत जर्मनीच्या अगोदर दृग्गोचर झालें होतें. इ. स. १२०४ सालीं जॉन राजाची म्हणजेच इंग्लंडची फ्रान्सपासून फारकत झाली तेव्हांच इंग्लंड हें राष्ट्र या मूर्तस्वरूपांत अस्तित्वांत आलें. त्याच सुमारास फ्रान्सला राष्ट्र हा मान प्राप्त झाला. पोर्तुगाल बाराव्या शतकांत व स्पेन पंधराव्या शतकांत राष्ट्र म्हणून गणूं लागलें. किंबहुना, युरोपांतील मोठ्या देशांपैकीं जर्मनी राष्ट्र म्हणून (१८७१ सालीं) सर्वांत शेवटीं मान्यता पावलें.

श्री. गर्गे यांचें प्रतिपादन स्पष्ट व सुसंगत आहे. त्यांचा दृष्टिकोन बुद्धिवादी व भौतिकवादी आहे. धार्मिक प्रेरणा व नैतिक प्रेरणा भिन्न आहेत; पहिलीचें अधिष्ठान श्रद्धा असतें तर दुसरीचें बुद्धि असूं शकतें. व्यक्तिस्वातंत्र्य, मानवी हक्क, आर्थिक व सामाजिक लोकशाही आणि विश्वबन्धुत्व यांचा पुरस्कार लेखकास अभिप्रेत आहे. देशकालपरिस्थित्यनुरूप राजकीय तत्त्वज्ञान बदलत गेलें. लेखकानें तत्त्वज्ञानामागील या भौतिक पार्श्वभूमीचा परामर्श जागोजागीं घेतला आहे. नगरराज्यें, रोमचा इतिहास, ख्रिश्चन धर्माचा उदय व प्रसार, सरंजामशाहीचे घोर परिणाम, राजेशाहीची कामगिरी, राष्ट्रवादाचा उद्रेक, भांडवलशाहीची समस्या यांचें व्यवस्थित वर्णन योग्य स्थळीं केलें आहे.

तत्त्वज्ञान व नीतिशास्त्र यांबरोबरच राजकीय तत्त्वज्ञान प्रथम अथेन्समध्यें अवतरलें. राजकीय तत्त्वचिन्तकांचीं नांवें जर मनापुढें आणलीं तर त्यांतील अनेक पिंडानें तत्त्वज्ञानी होते हें चटकन ध्यानांत येईल. प्लेटो, ॲरिस्टॉटल, स्टॉइक्स, ॲक्विनास, हॉब्ज, लॉक, हेगेल, ग्रीन, इ० राजकीय तत्त्वचिन्तक मूळ तत्त्वज्ञानी होते. नीतिशास्त्राचा एक भाग म्हणजे राज्यशास्त्र म्हणून त्यांनीं राज्यसंस्थेवर विचार केला. त्या दृष्टीनें राजकीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत या वैचारिक पार्श्वभूमीचा उल्लेख करावयास हवा होता. पण तसा उल्लेख सामान्य वाचकास खडतर व अगम्य झाला असता, असें लेखकास वाटलें असावें.

पुस्तकांतील सर्वच विचार राजकीय तत्त्वज्ञान म्हणून व्यक्त झाले नव्हते. ग्रीस आणि रोम येथें राजकीय विचारांचें प्रतिपादन जितकें बुद्ध्या झालेलें आढळतें तितकें प्राचीन अगर मध्ययुगीन काळांत कोठेंच झालें नाहीं. राजकीय विचार परिस्थितींत बदल घडवून आणतातच असें नाहीं. प्लेटो, ॲरिस्टॉटल या ग्रीक विचारवन्तांचे विचार जेव्हां व्यक्त झाले तेव्हां त्यांनीं आदर्श म्हणून मानलेल्या नगरराज्यांना अवनत कळा प्राप्त झाली होती, प्लेटो, ॲरिस्टॉटल, स्टॉइक्स, इ० विचारवन्तांनीं स्थापिलेलीं विद्यालयें म्हणजे राजकीय विचार प्रक्षेपित करणारीं केन्द्रेंच होतीं. स्टॉइक विचारप्रणालीचा प्रभाव रोमन कायद्यावर व विचारांवर जबरदस्त पडला होता. नवजात ख्रिश्चनधर्म व रोमन साम्राज्य यांच्या झगड्यांत, वा चर्च स्थापन झाल्यानंतर चर्च व ऐहिक परम्परा यांच्या रणधुमाळींत मांडलेले विचार राजकीय तत्त्वज्ञान म्हणून पुढें आले नव्हते. युरोपांतील विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या चळवळींत मात्र ग्रीक व रोमन विचारपरंपरेचा फार मोठा वांटा होता यांत शंका नाहीं. राजाच्या ईश्वरदत्त अधिकारावर गाजलेल्या वादामध्यें बहुमोल राजकीय विचार प्रगट झाले, आणि तत्कालीन इतिहासावर त्यांचा परिणामहि झाला. सतराव्या शतकांतील सामाजिक कराराच्या तत्त्वज्ञानाचीं बीजें स्टॉइक-तत्त्वज्ञानांत व प्रारंभीच्या ख्रिश्चन-विचारांत आढळतात. बदललेल्या परिस्थितींत त्यांना अभिनव व व्यापक अर्थ प्राप्त झाला. आधुनिक काळांत शिक्षणाच्या प्रसारामुळें दळणवळणांच्या साधनामुळें व संस्कृतीच्या देवघेवीमुळें राजकीय तत्त्वज्ञान खऱ्या अर्थानें विश्वव्यापी झालें आहे. प्रत्येक राजकीय चळवळीमागें निश्चित राजकीय तत्त्वज्ञान उभें असतें असेंहि नाहीं. स्फुट व विसंगत विचार, भाव, पूर्वग्रह वा परम्परा यांना तत्त्वज्ञानाचें स्वरूप मिळतें. फॅसिझमचें उदाहरण ताजें आहे.

राजकीय तत्त्वज्ञानाची एवढी मातब्बरी कां असाहि प्रश्न विचारण्याजोगा आहे. तत्त्वज्ञाना – ( Philosophy )चा परिस्थितीशीं कांहीं संबंध नसतो अशी सामान्य समजूत असते. पण तत्त्वज्ञानहि अनुभवजन्य असतें असें ड्युईसारख्यांनीं प्रतिपादिलें आहे. राजकीय तत्त्वज्ञान तर जीवनस्पर्शी असतें. राज्यसंस्था वर्तमानकाळांत जीवनस्पर्शी झाली आहे म्हणून राजकीय तत्त्वज्ञानहि जीवनस्पर्शी झालें आहे; याचें कारण इतिहास व परिस्थिति यांत शोधावें लागेल. श्री. गर्गे यांच्या पुस्तकाच्या वाचनानें हें कुतूहल निर्माण होईल.

—ना. र. इनामदार



अनुक्रमणिका





